॥ श्री ॥

# सुलभ श्रीमद्भागवत

## पंचम स्कंध

## अध्याय १ ला

राजा म्हणाला,—हे मुनिवर्य, प्रियव्रत हा मोठा भगवद्भक्त असून निरंतर आत्मस्वरूपांतच तल्लीन असे. असें असतां तो घरदार करून संसारसुखांतच मग्न होऊन कसा राहिला ? संसार किंवा गृहस्थाश्रम म्हटला कीं, त्याच्या योगानें कर्माचीं बंधनें अधिकाधिक दृढ होत जातात आणि आत्मस्वरूपानुभवाचा लोप होतो ॥ १ ॥ हे विप्रश्रेष्ठा, संसारावरील आसक्ति ज्यांनीं सोडिली, अशा प्रियव्रतासारख्या पुरुषांना घरदार करून प्रपंचांत राहण्याची बुद्धि होणें योग्य दिसत नाहीं ॥ २ ॥ हे ब्रह्मर्षे, असे जे थोर थोर सत्पुरुष असतात ते, ज्याची कीर्ति पवित्र आहे, अशा परमेश्वराच्या चरणकमलांच्याच छायेच्या आश्रयाला असल्यामुळें सदासर्वदा तृप्तच असतात. यामुळें त्यांचा कुटुंबाकडे मुळींच ओढा नसतो ॥ ३ ॥ हे ब्रह्मर्षे, आपण तर असें सांगितलें कीं, प्रियव्रत घरदार, बायकामुलें इत्यादिकांत रममाण झालेला असूनहि त्याची श्रीकृष्णाच्या ठिकाणीं भक्ति जडली आणि त्याला मोक्षहि प्राप्त झाला. तेव्हां हें कसें झालें ? ह्याविषयीं मला संशय उत्पन्न झाला आहे. ॥ ४ ॥

शुकाचार्य म्हणाले —राजा, तुझें म्हणणें अगदीं खरें आहे. तरीपण पुण्यकीर्ति परमेश्वराच्या चरणकमलांच्या मधुर मकरंदसेवनांत ज्यांचीं अंतःकरणें तद्रूप झालेलीं असतात असे पुरुष, भगवद्भक्त परमहंसांना प्रिय असणाऱ्या भगवंताच्या कथा हाच आपला खरा कल्याणाचा मार्ग होय, असें समजून मध्यंतरीं कांहीं कारणानें विघ्न येऊन थोडाबहुत खंड पडला, तरी आपला हरिभक्तीचा तो मार्ग ते बहुधा सोडीत नाहींत ॥ ५ ॥ हे राजा, प्रियव्रताची स्थितिहि तशीच होती. तोहि खरोखर राजपुत्र होता खरा; तरी तो महान् भगवद्भक्त होता. आणखी नारदाची चरणसेवा त्यास घडल्यामुळें त्याला आत्मस्वरूपाच्या तत्त्वाचें ज्ञान झालें होतें. तो पुढें ‘ ब्रह्मज्ञाना ’ची दीक्षाहि घेणार होता. इतक्यांत राजाच्या अंगीं जे जे गुण असावेत असें शास्त्रांत सांगितलें आहे, ते ते सर्व गुण त्याच्या अंगीं आहेत असें पाहून त्याचा पिता जो मनु त्यानें त्यास भूमंडळाचें रक्षण करण्याची आज्ञा केली;

परंतु प्रियव्रतानें षड्गुणैश्वर्यसंपन्न जगन्निवास ज्ञानदात्या परमेश्वराच्या ठिकाणीं एकाग्र चित्तानें समाधियोग लावून आपल्या सर्व इंद्रियांचे व्यापारहि त्यासच अर्पण केले होते. त्यास वाटलें कीं, एकदां हा राज्य चालविण्याचा शकट मस्तकावर घेतला कीं, प्रपंच जरी मिथ्या आहे तथापि त्याच्यामुळें आत्मचिंतनांत विघ्न हें होणारच. हें मनांत आल्यामुळें त्याला ती आपल्या पित्याची अनुल्लंघनीय आज्ञाहि मान्य करवेना ॥ ६ ॥ परंतु भगवान् ब्रह्मा हा, आदिदेव असल्यामुळें 'गुणांपासून उत्पन्न झालेल्या सृष्टीची वृद्धि कशी होईल' ह्या विचारांतच सदासर्वदा निमग्न असतो, म्हणून सर्व जगांत अंतस्थ काय काय चाललें आहे, तें त्याला निश्चयानें कळत असतें. अर्थात् प्रियव्रताच्या मनांतील भावार्थहि त्याच्या लक्षांत आला; म्हणून तो स्वयंभू ब्रह्मदेव साऱ्या वेदांसहवर्तमान मरीच्यादि आपले सारे ऋषिगण घेऊन सत्यलोकाहून खालीं उतरला ॥ ७ ॥ तेव्हां त्याचें दर्शन घेण्यासाठीं ठिकठिकाणीं अनेक देव येऊन बसले होते. आकाशामध्यें त्यांच्या विमानांच्या ओळीच्या ओळी दिसत होत्या. मार्गामध्यें जागोजाग इंद्रादि देवांनीं त्याची पूजा केली. जिकडेतिकडे सिद्ध, गंधर्व, साध्य, चारण व मुनि ह्यांचे थवेच्या थवे उभे राहून त्याचे स्तुतिपाठ गात होते. अशा प्रकारें तो भगवान् ब्रह्मदेव गंधमादन पर्वताच्या गुहेला चंद्राप्रमाणें प्रकाशित करीत तेथें येऊन पोंचला ॥ ८ ॥ तों तेथें नारद प्रियव्रताला उपदेश करीत बसले होते आणि मनु त्यास घराकडे न्यावयासाठीं आलेला होता. हंसवाहन ब्रह्मदेव तेथें आलेला पाहतांच देवर्षि नारदानें तत्काळ 'हा आपला पिता भगवान् हिरण्यगर्भ ब्रह्मदेव होय' हें ओळखलें. त्यानें लागलींच मनु व प्रियव्रत ह्या पितापुत्रांसह उठून त्याची पूजा केली व हात जोडून त्याचें स्तवन केलें ॥ ९ ॥ राजा, नारदानें ब्रह्मदेवाची पूजा केली आणि यथायोग्य शब्दांनीं त्याच्या गुणगणांचें, अवताराचें व उत्कर्षाचें वर्णन केलें. तेव्हां आदिदेव जो ब्रह्मा त्यानें हास्ययुक्त कृपादृष्टीनें अवलोकन करून प्रियव्रताशीं बोलावयास प्रारंभ केला ॥ १० ॥

ब्रह्मदेव म्हणाला,—बाळा, मी जें काय सांगतों तें नीट ऐकून घे. मी अगदीं सत्य सांगत आहें. ज्याच्या गुणांना अंतपार नाहीं अशा त्या परमेश्वराला दोष देणें युक्त नव्हे. बाळा, शंकर, तुझा पिता मनु आणि हा तुझा गुरु देवर्षि नारद, हे सारे आम्हीं त्या प्रभूच्याच आधीन आहों आणि त्याचीच आज्ञा शिरसावंद्य मानितों ॥ ११ ॥ त्या परमेश्वरानें केलेली गोष्ट, तपश्चर्येच्या योगानें म्हणा, विद्येनें म्हणा, योगबलानें म्हणा, बुद्धिसामर्थ्यानें म्हणा, द्रव्यबळानें म्हणा, धर्मानें म्हणा, कीं दुसऱ्या कोणत्याही साधनानें म्हणा, खोटी पाडील असा एकसुद्धां प्राणी नाहीं ॥ १२ ॥ बाळा, उत्पत्तीसाठीं, नाशासाठीं, कर्मे करण्यासाठीं किंवा शोक, मोह व सुखदुःखें भोगण्यासाठीं परमेश्वरानें जो जो देह लावून दिला असेल तो तो देह प्राणिसमुदाय धारण करीत असतो ॥ १३ ॥ बाळा, त्याची वाणी म्हणजे वेद, ही एक दावण असून त्या दावणीला आपण सारे गुणकर्मबंधनानें गच्च जखडलेले आहोंत. हीं दावीं तुटणें महत्कर्म कठीण आहे. त्यामुळें

नाकांत वेसण घातलेलीं जनावरें ज्याप्रमाणें मनुष्याची हवी ती सेवा करतात, त्याप्रमाणें आम्हीहि त्या ईश्वराला पूजा अर्पण करतों ॥ १४ ॥ परमेश्वर आम्हांला जो जो कांहीं सुखाचा किंवा दुःखाचा वांटा आमच्या गुणकर्माला अनुसरून देईल तो तो घेऊन आम्हीं मुकाट्यानें स्वस्थ बसतों आणि आंधळा जसा, डोळस नेईल तिकडे तिकडे जातो, त्याप्रमाणें परमेश्वर आम्हांला गुणांच्या आणि कर्मांच्या धोरणानें देव, मनुष्य, पशु, पक्षी इत्यादि ज्या ज्या योनींत घालील त्या त्या योनि स्वीकारून आम्हांलाही राहावें लागतें ॥१५॥ ह्या गोष्टी केवळ अज्ञानी जीवालाच लागू आहेत असें नाहीं, तर ज्ञानी पुरुषालासुद्धां लागू आहेत; पण झोपेंतून उठलेल्या मनुष्याला स्वप्नांत पाहिलेल्या सुखदुःखांच्या गोष्टी आठवल्या तरी त्यांचा त्याला अभिमान असत नाहीं, तशी स्थिति मुक्ताची असते. तोहि आपल्या शरिराचा अभिमान न धरतां प्रारब्धकर्माचें फळ भोगून त्याचा क्षय करीत असतो. कर्मांत पुनर्जन्माला साधनीभूत असे जे गुण, त्याचा मात्र तो मुळींच स्वीकार करीत नाहीं ॥१६॥ जो मनुष्य मूळचाच अविचारी आहे, तो जरी सारा संसर्ग सोडून अरण्यांत जाऊन राहिला, तरी त्याच्यामागच्या यातना म्हणून मुळीं सुटतच नाहींत. कारण तो एकटा म्हणून जरी अरण्यांत जातो, तरी कामक्रोधादि षड्रिपु हे त्याच्याबरोबर असतातच; परंतु ज्याचीं इंद्रियें स्वाधीन आहेत व जो आत्मस्वरूपांतच निरंतर रममाण असतो असा ज्ञानी पुरुष गृहस्थाश्रमांत असला तरी त्याचें कांहींच बांकडें होत नाहीं ॥ १७ ॥ खरोखर षड्रिपु ज्याला जिंकावयाचे असतील त्यानें प्रथम गृहस्थाश्रमाचाच स्वीकार करावा आणि तेथेंच आपलें इच्छित कार्य साधण्याचा हळूहळू यत्न करावा; कारण, किल्ल्याच्या आधारानें बलवान् शत्रु जेरीस आणितां येतात. शत्रूची एकदां पांगापांग झाली म्हणजे किल्ल्यांतील लोकांना पाहिजे तिकडे बावरतां येतें ॥ १८ ॥ प्रियव्रता, तुला तर विष्णूच्या चरणकमलकोशरूपी किल्ल्याचा भक्कम आश्रय आहे. आणखी तूं षड्रिपूंनाहि जिंकलें आहेस. ह्याकरितां ईश्वरानें दिलेले सुखोपभोग तूं आधीं भोगून घे आणि मग सर्वसंगपरित्याग करून आत्मस्वरूपामध्यें रममाण हो ! ॥ १९ ॥

शुक्राचार्य म्हणाले,—राजा, ह्याप्रमाणें ब्रह्मदेवानें त्या महाभगवद्भक्त प्रियव्रताला उपदेश केला, तेव्हां प्रियव्रतानेंहि, भगवान् ब्रह्मदेव म्हणजे त्रैलोक्याचे गुरु, आपण त्याच्यापुढें केवळ क्षुद्रपदार्थ आहोंत असा विचार मनांत आणून, 'उत्तम आहे' असें म्हटलें व त्याची आज्ञा परमादरानें शिरसावंद्य केली ॥ २० ॥ नंतर मनूनें ब्रह्मदेवाची यथायोग्य पूजा केल्यावर प्रियव्रत व नारद यांच्या मनांत विषमभाव उत्पन्न न होतां ते उभयतां ब्रह्मदेवाकडे प्रेमभरित दृष्टीनें पाहात असतां, तो ब्रह्मदेव, ज्या ठिकाणीं कोणताच व्यवहार नाहीं व जें वाणीचा किंवा मनाचाहि विषय नव्हे, अशा आपल्या श्रेष्ठ विष्णुपदाचें मनांत चिंतन करीत आपल्या निवासस्थानीं निघून गेला ॥ २१ ॥ मनूचा मनोरथ हाच होता. तो ब्रह्मदेवानें आपण होऊनच सिद्धीस नेला हें पाहून त्यानेंहि देवर्षि श्रेष्ठ नारदाचें अनुमोदन घेऊन विस्तृत भूमंडळाचें रक्षण करणाऱ्या कामावर आपल्या त्या पुत्राची

स्थापना केली आणि तो स्वतः घरादाराची आशा सोडून विरक्त झाला. कारण घर म्हणजे सामान्य वस्तु नव्हे, तर तो एक तरून जाण्यास कठीण असा विषयरूप विषानें भरलेला डोहच होय ॥ २२ ॥ अशा प्रकारें त्या प्रियव्रतराजाला ईश्वरेच्छेनें कर्माधिकार प्राप्त झाला. तरी तो प्रियव्रत, ज्याचें लोकोत्तर सामर्थ्य सर्व जगाचें बंधन दूर करतें, त्या पुराणपुरुष भगवंताचें नित्य ध्यान करीत असे. त्या ध्यानाच्या प्रभावानें त्याच्या अंतःकरणांतील कामक्रोधादि सारे मल दग्ध होऊन तो अगदीं पवित्र झाला होता. तरीसुद्धां ब्रह्मदेवासारख्या थोरामोठ्यांना त्यांची आज्ञा पाळून मान द्यावा म्हणून त्यानें साऱ्या पृथ्वीच्या राज्याचें जूं आपल्या मानेवर घेतलें ॥ २३ ॥ पुढें त्या प्रियव्रतराजानें विश्वकर्मा प्रजापतीच्या बर्हिष्मतीनामक कन्येशीं विवाह केला. तिच्यापासून त्याला दहा पुत्र आणि सर्वांपेक्षां लहान अशी ऊर्जस्वती या नांवाची कन्या अशीं अकरा अपत्यें झालीं. प्रियव्रताचे दहाहि पुत्र त्याच्याचसारखे सुशील, सद्गुणी, कुशल, सुस्वरूप, शूर व उदार असे होते ॥ २४ ॥ त्या सर्वांना अनुक्रमानें आग्नीध्र, इध्मजिह्व, यज्ञबाहु, महावीर, हिरण्यरेता, घृतपृष्ठ, सवन, मेधातिथि, वीतिहोत्र आणि कवि अशीं अग्निवाचक नांवें दिलेलीं होतीं ॥ २५ ॥ ह्यांपैकीं कवि, महावीर, सवन हे तिघे नैष्ठिक ब्रह्मचारी होते. ह्यांनीं बालपणापासूनच आत्मज्ञानाचा अभ्यास करून परमहंस दीक्षेचाच स्वीकार केला ॥ २६ ॥ हे अत्यंत शांतवृत्तीचे महर्षि होते. त्यांनीं त्या आश्रमामध्यें संपूर्ण जीवसमूहाचा आधार, षड्गुणैश्वर्यसंपन्न जगन्निवास, ज्ञानदाता आणि भयग्रस्त झालेल्या लोकांचा आश्रय असा जो परमात्मा, त्याच्या अत्यंत रमणीय चरणकमलांचें चिंतन केलें. त्यामुळें परमदुःसाध्य असा भक्तियोग साध्य होऊन त्याच्या प्रभावानें त्यांचीं अंतःकरणें शुद्ध झालीं आणि त्या अंतःकरणांना प्रत्यक्ष भगवत्स्वरूपाचें दर्शनहि होऊं लागलें. पुढें पुढें तर ते आपल्या देहादि उपाधींचा निरास करून सर्व प्राणिमात्रांचा आत्मा आणि आपला हृदयनिवासी अशा त्या परमात्म्याच्या ठिकाणीं सर्वस्वीं एकरूप होऊन गेले ॥ २७ ॥

प्रियव्रताला दुसरीहि एक पत्नी होती. तिच्यापासून त्याला उत्तम, तामस व रैवत नांवाचे तीन पुत्र होऊन ते पुढें मन्वंतराचे अधिपति झाले ॥ २८ ॥ अशा प्रकारें प्रियव्रताचे हे पुत्र निवृत्तिमार्गास लागले असतां त्यानें एकशें दहा कोटिवर्षेंपर्यंत पृथ्वीचें राज्य भोगिलें. त्याच्या उभय बाहूंत असें कांहीं अद्भुत सामर्थ्य होतें कीं, त्यानें कोणत्याहि कामास हात घातला तरी त्यांत यश आलें नाहीं असें घडत नसे. अशा वज्रसदृश बाहुद्वयानें जेव्हां तो आपल्या धनुष्याची दोरी ओढून टणत्कार करी, त्या वेळीं त्या शब्दानेंच धर्माचे विरोधी गतप्राण होत ! त्या राजाच्या सहवासामुळें बर्हिष्मतीराणीचा आनंद उत्तरोत्तर वृद्धिंगतच होत असे. राजा आला कीं तिनें उभें राहावें, लाजलेंसें करून मुरकत मुरकत पुढें यावें, चोरून हसावें, नेत्रकटाक्ष फेंकावेत व मंजुळ भाषण करावें. हे तिचे सर्व विलास पाहिले म्हणजे प्रियव्रतराजा, जणूं काय आपली विचारशक्तिच नष्ट झाली आहे, आपण शुद्ध अज्ञानी आहों, असें दाखवी; पण वस्तुतः तो

महाज्ञानी होता ॥ २९ ॥ भगवान् सूर्यनारायण मेरुपर्वताच्या सभोंवतीं प्रदक्षिणा घालून साऱ्या भूमंडळाला प्रकाश देतो, ही गोष्ट खरी; पण त्याचा प्रकाश भूमंडळावर असतो तो एकसारखा असत नाहीं; तर पृथ्वीच्या अर्ध्या भागावर प्रकाश असला तर दुसऱ्या अर्ध्यावर अंधार असतो. ही गोष्ट प्रियव्रताच्या मनाला फार खात असे. कारण भगवंताच्या उपासनेमुळें त्याचा स्वतःचा प्रभाव इतका वाढला कीं, त्याच्यासारखा दुसरा प्रभावशाली पुरुष साऱ्या जगांत कोणी मिळावयाचा नव्हता. तेव्हां त्यानें असा विचार केला कीं, रात्रीचासुद्धां आपण दिवस करून सोडूं. असें म्हणून सूर्याच्या रथासारख्या वेगवान् अशा दिव्य रथांत बसून त्यानें सूर्याच्या मागून सात वेळ फिरून पृथ्वीभोंवतीं सात प्रदक्षिणा घातल्या. तेव्हां पृथ्वीवरील सर्व लोकांना हा दुसरा सूर्यच आहे असें वाटलें ॥ ३० ॥ प्रियव्रताच्या ह्या नव्या रथाचीं चाकें वेगानें पृथ्वीवरून जात असल्यामुळें पृथ्वीवर त्याचे मोठमोठाले खड्डे पडले, त्याचेच हे सात समुद्र झाले आहेत आणि त्यामुळेंच पृथ्वीवर सुद्धां पुढें द्वीपरूपानें सात भाग पडले ॥ ३१ ॥ जंबू, प्लक्ष, शाल्मलि, कुश, क्रौंच, शाक आणि पुष्कर हीं त्या द्वीपांचीं नांवें होत. त्यांच्या विस्ताराचें प्रमाण पाहावयास गेलें तर पहिल्यापेक्षां दुसरें दुप्पट, दुसऱ्यापेक्षां तिसरें दुप्पट, असें अनुक्रमानें एकाहून एक चढतें आहे. त्या सात समुद्रांच्या बाहेर सभोंवार हीं बेटें उत्पन्न झालेलीं आहेत ॥ ३२ ॥ क्षारसमुद्र, इक्षुरससमुद्र, मद्यसमुद्र, घृतसमुद्र, दुग्धसमुद्र, दधिमंडसमुद्र, शुद्धोदकसमुद्र, ह्या नांवांचे सात समुद्र आहेत. हे सात समुद्र त्या सात द्वीपांभोंवतीं खंदकाप्रमाणें वेढा घालून असतात. प्रत्येक द्वीपाच्या भोंवतीं एक समुद्र याप्रमाणें सात द्वीपांभोंवतीं सात समुद्रांचा वेढा आहे. ह्या सात द्वीपांमध्यें बर्हिष्मतीचा पति जो प्रियव्रत त्यानें आपल्या आग्नीध्र, इध्मजिह्व, यज्ञबाहु, हिरण्यरेता, घृतपृष्ठ, मेधातिथि आणि वीतिहोत्र ह्या प्रत्येक पुत्राला एकएका द्वीपाचा अधिपति करून तेथें बेटावर त्यांची स्थापना केली. हे मुलगे पित्यासारखेच शूर होते ॥ ३३ ॥ त्यानें आपली कन्या ऊर्जस्वती शुक्राला दिली; हिच्यापासून पुढें शुक्राचार्याला देवयानी या नांवाची कन्या झाली ॥ ३४ ॥

राजा प्रियव्रतानें अशा प्रकारचा अद्भुत पराक्रम केला ह्यांत कांहीं मोठेंसें नवल नाहीं. कारण, भगवद्भक्तांचें सामर्थ्य नेहमीं असेंच लोकविलक्षण असतें. त्यांनीं ईश्वराच्या पायधुळीनें सहाहि इंद्रियें जिंकिलेलीं असतात. परमेश्वराचें सामर्थ्य किती लोकोत्तर असतें पाहा! अंत्यजासारखा चातुर्वर्णातीत अतिदूरचा पुरुषसुद्धां एकवार परमेश्वर नांवाचा उच्चार करील तर त्याचेंहि बंधन तत्काळ दूर होतें ॥ ३५ ॥

ह्यावरून प्रियव्रताची बुद्धिमत्ता व शरीरसामर्थ्य किती लोकोत्तर होतें हें सहजच समजण्यासारखें आहे; पण पुढें नारदासारख्यांच्या चरणाचा लाभ होऊनहि आपल्यावर जो हा प्रपंचाचा गुंता येऊन पडला, त्यानें आपल्याला सुख म्हणून कसलें तें नाहीं. खऱ्या सौख्याला आपण सर्वस्वीं आंचवलों, असें त्याला वाटून त्याच्या मनाला पश्चात्ताप झाला आणि आपल्याशींच तो म्हणूं लागला ॥ ३६ ॥

"अहो ! केवढें हो मी हें अनुचित कर्म केलें कीं, अज्ञानानें रचलेल्या या विषयरूपी काळोख्या विहिरींत अभिमान धरून पडलों आहें. आतां झालें एवढें पुरे. अरेरे, मी या स्त्रीचें ताटाखालचें मांजर होऊन राहिलों होतों ना ? धिःकार असो मला !" अशा प्रकारें प्रियव्रत आपली आपणच निर्भर्त्सना करूं लागला ॥ ३७ ॥ तेव्हां परमेश्वराच्या अनुग्रहामुळें प्रियव्रताला आत्मविवेक उत्पन्न झाला. त्याच्या अंतःकरणांत वैराग्य संचरलें आणि परमेश्वरचरित्राचें मनन केल्यामुळें सर्वसंगपरित्याग करण्याचें सामर्थ्यहि त्याच्या अंगीं आलें. त्यानें आपली आज्ञा पाळण्यामध्यें निरंतर तत्पर असलेल्या आपल्या सर्व पुत्रांस यथाविभागानें पृथ्वीचें राज्य वांटून दिलें आणि ज्या रूपावतीराणीचा त्यानें उपभोग घेतला होता, ती आपली राणी आणि तिच्याबरोबर अपरिमित संपत्ति हीसुद्धां सर्व त्यांच्याच स्वाधीन करून अखेर नारदमुनीनें दाखवून दिलेल्या मार्गाचा त्यानें अवलंब केला ॥ ३८ ॥ त्याच्या चरित्रासंबंधानें हे पुढील श्लोक प्रसिद्ध आहेत. प्रियव्रतानें जें चरित्र केलें तसें करण्याचें सामर्थ्य ईश्वराशिवाय अन्य कोणाला असणार ? त्यानें पृथ्वीवरील सारा अंधकार नाहींसा केला आणि आपल्या रथाच्या धांवेच्या खड्ड्यानें सप्त समुद्र निर्माण केले ॥ ३९ ॥ प्राण्यांना सुख देण्यासाठीं पृथ्वीवर निरनिराळ्या द्वीपांची त्यानें रचना केली आणि नद्या, पर्वत, अरण्यें इत्यादिकांच्या योगानें पृथ्वीच्या सीमा ठरवून टाकिल्या ॥ ४० ॥ ईश्वराचे भक्त त्याला फार प्रिय असत. कर्मयोगानें प्राप्त होणारें पाताळांतील, स्वर्गांतील व मृत्युलोकांतील सारें वैभव त्यानें केवळ नरकाप्रमाणें तुच्छ मानिलें ॥ ४१ ॥

**पहिला अध्याय समाप्त**

---

# अध्याय २ रा

शुकाचार्य म्हणतात,—अशा रीतीनें आपला पिता प्रियव्रत नारदाच्या उपदेशाप्रमाणें भगवद्भजनीं लागला असें पाहून अग्नीध्रानें पित्याची आज्ञा पाळण्यासाठीं धर्मावर दृष्टि देऊन जंबुद्वीपांत राहाणाऱ्या प्रजाजनांचें आपल्या पोटच्या मुलांप्रमाणें पालनपोषण केलें ॥ १ ॥ पुढें त्याला पितृलोकप्राप्तीची इच्छा होऊन आपल्यास पुत्र प्राप्त व्हावा असें वाटूं लागलें, म्हणून तो तपश्चर्या करूं लागला. त्यानें पूजासाहित्य जमविलें आणि मंदाराचलाच्या पहाडांत एकाग्रचित्तानें ब्रह्मदेवाची आराधना चालविली. ह्या पर्वतावर उत्तमोत्तम देवांगनाही क्रीडेसाठीं येत असतात ॥ २ ॥ भगवान् आदिपुरुष जो ब्रह्मदेव त्याला हें वर्तमान कळलें; तेव्हां त्यानें देवसभेंत गायन करणारी पूर्वचित्ति नांवाची अप्सरा त्याच्याकडे पाठवून दिली ॥ ३ ॥ आग्नीध्राच्या आश्रमाजवळचें उपवन अत्यंत रमणीय होतें. तेथें नाना प्रकारचे वृक्ष घनदाट भरलेले असून त्यांच्या विस्तारलेल्या शाखांवर सुवर्णाच्या वेली लपटलेल्या होत्या. त्यांच्यावर नाना पक्ष्यांच्या जोड्या बसून मधुर शब्द करीत होत्या. ते त्यांचे शब्द ऐकले कीं, पानकोंबडीं, बगळे, बदकें, राजहंस वगैरे जलचर पक्षीही आपआपले शब्द करूं लागत. त्या चित्रविचित्र शब्दांनीं तेथें असणाऱ्या सरोवरांतील कमलवनें दुमदुमून जात. अशा त्या वनामध्यें पूर्वचित्ति अप्सरा येऊन स्वेच्छेनें इकडेतिकडे फिरूं लागली ॥ ४ ॥ राजपुत्र आग्नीध्र तेथें समाधि लावून बसला होता. त्यानें कमळाच्या कळ्यांसारखे आपले दोन्ही नेत्र मिटले होते. अप्सरा मोहकपणानें ठुमकत ठुमकत चालूं लागली म्हणजे त्यांच्या त्या मंद गतींतच तिचें विलासकौतुक दिसून येत असे. पावलांबरोबर तिच्या पायांतील नूपुरें रुणझुणरुणझुण वाजत. तो मंजुळ शब्द जेव्हां त्या राजपुत्राच्या कर्णरंध्रांत घुमूं लागला, तेव्हां तो आपले नेत्र उघडून थोडेंसें पाहूं लागला. ॥ ५ ॥ तो अप्सरेचा मोहकपणा काय विचारावा ? तिची ती हंसगति, चलनवलन, लाजून हसणें, विनयानें पाहणें, मंजुळ भाषण आणि नेत्रकटाक्षादि हावभाव पाहिले कीं, मनुष्यांचींच नव्हे, तर देवांचीं मनें व नेत्र आनंदानें भरून जात व कोणत्याहि पुरुषाच्या मनांत मदनाचा संचार होई. तिच्या मुखांतून जें भाषण बाहेर पडे, तें अमृतासारखें मधुर आणि मद्यासारखें मादक व हास्ययुक्त असे. इतकेंच नव्हे तर तिच्या श्वासोच्छ्वासाच्या योगानें चहूंकडे परिमळ सुटत असे. त्यामुळें त्या मदानें अंध झालेला भ्रमरसमुदाय तिच्या पाठोपाठ गुंजारव करीत लागल्यामुळें तिला अगदीं पुरें पुरें होऊन ती झपाझपा पावलें टाकीत होती. त्यामुळें तिचे कलशाकार स्तन, वेणी, कमरपट्टा हीं हळूहळू हालत. अशी ती देवांगना आग्नीध्राच्या दृष्टीस पडल्याबरोबर भगवान् कामदेवाला संधि मिळून त्यानें त्याच्यावर झडप घातली. त्यामुळें तो राजा वेड्यापिशासारखा होऊन तिच्याशीं बोलूं लागला ॥ ६ ॥ तो म्हणाला,—अहो ऋषिवर्य, आपण कोण आहां ? आपण ह्या पर्वतावर काय करीत आहां ? आपण त्या

भगवान् परमेश्वराची अवर्णनीय अशी माया आहां कीं काय ? तुझ्याजवळ हीं दोन धनुष्यें ( नेत्र ) दिसत आहेत, पण ह्यांना कोठें दोऱ्या लावलेल्या दिसत नाहींत. हीं धनुष्यें तूं स्वतःसाठीं बाळगलीं आहेस, तरी अरण्यांतील माजलेल्या पशूंचा वध करण्याची तुझी इच्छा आहे काय ? ॥ ७ ॥ तुझे बाण मोठे विचित्र दिसतात. त्यांना कमलपत्राचा पिसारा लावला आहे, ते झिलई दिल्याप्रमाणें अगदीं तुळतुळीत आहेत. त्यांना पाठीमागचा दांडा नाहीं तरी ते दिसण्यांत सुंदर असून त्यांचीं टोकें फारच तीक्ष्ण आहेत. आपण वनामध्यें फिरतांफिरतां हे बाण कोणावर टाकणार ? मंदबुद्धीमुळें आम्हांला हें कळत नाहीं तथापि तुमचें सामर्थ्य आम्हांला कल्याणकारक होवो ॥ ८ ॥ [ तिच्या शरिराच्या सुगंधाला लुब्ध झालेले भ्रमर तिच्या मागून गुंगत आहेत असें पाहून राजपुत्र म्हणतो ] हे आपले शिष्यगण आपणाभोंवतीं उभे राहून पाठ म्हणत आहेत व ईश्वराच्या स्तुतीनें भरलेलीं रहस्यासह बृहद्रथंतरादिक सामें गात आहेत. ऋषिगणांनीं वेदांच्या शाखा ग्रहण केल्या, त्याप्रमाणें हे सर्वजण तुमच्या जटांतून होत असलेल्या पुष्पवृष्टीचा स्वीकार करीत आहेत ॥ ९ ॥ हे ब्रह्मनिष्ठ मुने, आपल्या पायांना ( पैंजणरूप ) पिंजरे बांधलेले असून त्यांतील सारिका ( कोंदणांतील रत्नांच्या धागऱ्या ) मंजुळ शब्द करतात. तो कानाला ऐकूं येतो; पण त्या सारिका डोळ्यांना मात्र कोठें दिसत नाहींत. अहाहा ! हें तुमचें नितंबमंडळ किती तरी सुंदर आहे ! ह्याच्यावर कळंबाच्या फुलाच्या रंगाची झाक [ पीतांबर ] असून तिच्यावर कोलतीच्या चक्रासारखें तेजस्वी वेष्टन [ कमरपट्टा ] आहे; परंतु, कां हो ? तुमचें वल्कल कोठें दिसत नाहीं ? ॥ १० ॥ ( तिच्या स्तनांकडे पाहून ) ब्रह्मर्षे, आपल्या ह्या सुंदर शृंगामध्यें काय बरें भरलेलें आहे ? तुमचा मध्यभाग पाहिला तर तो अत्यंत कृश असतांही आपण येवढ्या जड शृंगांचें ओझें वागवितां ! ह्या आपल्या शृंगांवर माझे डोळे तर अगदीं खिळून राहिले आहेत. आपल्या ह्या शिंगांवर तांबड्या रंगाचा कसला लेप [ केशराची उटी ] फांसला आहे ? हे रमणीय मूर्ते, ह्या लेपानें माझा सारा आश्रम सुगंधित करून सोडिला आहे ॥ ११ ॥ हे मित्रोत्तमा, तुझें राहण्याचें स्थान कोणतें तें मला दाखव. कारण, तेथील लोक आपआपल्या वक्षःस्थळावर असले हे अद्भुत अवयव धारण करीत असतीलच. हे अवयव पाहिले कीं, आमच्यासारख्यांच्या मनाची तर अगदीं चलबिचल उडून जाते ! आणखी सर्वांत विशेष आश्चर्य हें कीं, तेथील लोकांच्या तोंडांत मधुर आलाप, विलास, अमृत [ अधरोष्ठामृत ] आणि मंजुळ शब्द हीं कशीं ओतप्रोत भरलेलीं आहेत ॥ १२ ॥ [ ती अप्सरा तांबूल खात होती, तिच्याकडे पाहून तो म्हणालाः— ] मित्रा, तूं भुकेच्या वेळीं खातोस तरी काय ? तें खातांना होमद्रव्यासारखा त्याचा सुगंध सुटलेला आहे. मला तर वाटतें कीं, तूं विष्णूची कला आहेस. कारण, विष्णूप्रमाणेंच तुझ्या कानांतही उत्कृष्ट मकरकुंडलें शोभत असून त्या मकरांचे नेत्र रत्नांचे असल्यामुळें त्यांना पापण्या नाहींत ! तुझें मुख तर एखाद्या सरोवराप्रमाणें दिसतें. सरोवरांत माशांची जोडपीं इकडे तिकडे चपल गतीनें फिरत आहेत. सरोवराच्या कांठीं पक्ष्यांच्या ओळीच्या ओळी

बसल्या म्हणजे त्यास शोभा चढते तद्वत् तुझ्या दंतपंक्तींनीं तुझ्या मुखरूप सरोवरालाही शोभा आणिली आहे. सरोवराजवळ कमलगंधाला लुब्ध झालेले भ्रमर फिरत असतात, इकडे भ्रमराप्रमाणेंच तुझा विस्कळीत केशसमूह तुझ्या मुखाभोंवतीं इतस्ततः हेलकावत आहे ।। १३ ।। तूं आपल्या करकमलानें ताडण केलेला हा चेंडू जों जों दशदिशांकडे धांवतो, तों तों त्याच्याबरोबर माझ्या अंतःकरणालाहि गिरक्या खाव्या लागतात. त्यानें माझ्या ह्या डोळ्यांना अगदीं चंचळ करून सोडलें आहे. तुझ्या कुरळ केशांचा जटाकलाप मोकळा सुटला आहे. तिकडे अजूनही तुझें लक्ष जात नाहीं ! अरेरे ! हा त्रासदायक वायु तरी तुझ्यावर किती लंपट झाला आहे पाहा ! तो तुझ्या निऱ्याच उडवितो आहे ! ।। १४ ।। हे तपोधना, दुसऱ्याच्या तपाचा भंग करणारें हें तुझें सुंदर रूप तुला कोणत्या तपोबळानें प्राप्त झालें बरें ? मित्रा, तूं निरंतर माझ्याबरोबर येथेंच तपश्चर्या करीत राहावें असें मला वाटतें. सृष्टिकर्ता ब्रह्मदेवच मला प्रसन्न झालासें दिसतें. ।।१५।। हे ब्राह्मणा, ब्रह्मदेवानें तुझी गांठ घालून दिली. तूं मला प्राणाहूनही प्रिय वाटतोस. माझें मन आणि दृष्टि तुझ्याकडे इतकीं लागून राहिलीं आहेत कीं, तीं तेथून निघतच नाहींत. म्हणून मी तुला कदापि सोडणार नाहीं. तुझीं दोन्हीं शिंगें मनाला फारच आल्हाद देतात. हे सुंदरि, मी तुझ्या मनाप्रमाणें वागण्यास तयार आहें. तुझ्या मनाला वाटेल तिकडे तूं मला घेऊन जा. ह्या हितचिंतक तुझ्या मैत्रिणी दूर होवोत ! ।। १६ ।।

शुकाचार्य म्हणाले,—हे राजा, आग्नीध्र हा स्त्रियांना वश कसें करून घ्यावें या कामांत मोठा निष्णात होता. त्याची बुद्धि तर काय देवासारखी किंवा पंडितासारखी होती. म्हणून त्यानें अशा रीतीनें शृंगारविषयक चातुर्यानें भरलेलीं भाषणें करून त्या अप्सरेचें मन तर वळविलें ।। १७ ।। तेव्हां जंबुद्वीपाचा अधिपति आणि वीरांच्या समुदायाचा पुढारी, अशा त्या आग्नीध्राची अलोट बुद्धि, मिठा स्वभाव, मदनासारखें स्वरूप, मुसमुसलेलें तारुण्य, कुबेरासारखी संपत्ति, कर्णासारखें औदार्य इत्यादि गुण पाहून त्या पूर्वचित्तिनामक अप्सरेचें मन वेधून गेलें आणि ती त्याच्याबरोबर दहा कोटि वर्षेपर्यंत इहलोकचे आणि परलोकचे भोग भोगीत राहिली ।। १८ ।। तिच्या पोटीं त्या राजाधिराज आग्नीध्राला नऊ पुत्र झाले. त्यांचीं नांवें, नाभि, किंपुरुष, हरिवर्ष, इलावृत, रम्यक, हिरण्मय, कुरु, भद्राश्व आणि केतुमाल अशीं होतीं ।। १९ ।। पूर्वचित्तीला प्रत्येक वर्षास एक, याप्रमाणें नऊ वर्षांत नऊ पुत्र झाल्यावर ती त्या मुलांना घरीं सोडून पुनः ब्रह्मदेवाच्या सेवेसाठीं त्याच्याजवळच जाऊन राहिली ।। २० ।। आग्नीध्राच्या ह्या मुलांचें संगोपन त्याच्या आईनें फार काळजीपूर्वक केल्यामुळें त्यांचीं शरीरें मूळचींच फार सुंदर होतीं. ते पुढें मोठे पराक्रमी निपजले. पित्यानें जंबुद्वीपाचे नऊ विभाग करून त्यांतील प्रत्येक विभागाला आपल्या पुत्राचें एक एक नांव दिलें आणि ज्याचा त्याचा विभाग ज्याला त्याला देऊन टाकिला आणि ते त्या भागांचें राज्य करूं लागले ।। २१ ।। इतका सुखोपभोग घेतला, इतके विलास भोगले, तरी आग्नीध्राची तृप्ति

म्हणून कांहीं झाली नाहीं. त्याच्या मनांत रात्रंदिवस ती अप्सराच घोळत असे. म्हणून त्यानें वेदांत सांगितलेलीं अनेक काम्य कर्मे करून तिचें स्थान प्राप्त करून घेतलें. ज्या लोकामध्यें पितर आनंदानें राहात असतात ॥२२॥ मग पिता परलोकवासी झाल्यावर त्या नऊ भावांनीं मेरूच्या कन्यांशीं विवाह केला. त्या मुलींचीं नांवें मेरुदेवी, प्रतिरूपा, उग्रदंष्ट्री, लता, रम्या, श्यामा, नारी, भद्रा आणि देववीति अशीं होतीं ॥ २३ ॥

## दुसरा अध्याय समाप्त

---

# अध्याय ३ रा

शुक्राचार्य म्हणाले,—हे राजा, मेरुदेवीच्या पोटीं तर संतान नव्हतें. आणि नाभिराजाला तर पुत्रप्राप्ति व्हावी अशी दृढ इच्छा होती; म्हणून त्यानें एकाग्र अंतःकरणानें भगवान् यज्ञनारायणाप्रीत्यर्थ यज्ञाला प्रारंभ केला ॥ १ ॥ नाभिराजा भक्तिभावानें व निर्मळ अंतःकरणानें यज्ञ करीत होता. द्रव्य, देश, काल, मंत्र, ऋत्विज्, दक्षिणा आणि विधान हीं जी यज्ञाचीं मुख्य साधनें तीं त्यानें उत्तम प्रकारें जमविलीं होतीं. त्या यज्ञांतील 'प्रवर्ग्य' नांवाचीं जीं विशिष्ट कर्में तीं चालू झालीं असतां दयाळु भगवान् दुष्प्राप्य असतांहि आपल्या भक्तावर प्रसाद करण्याविषयीं फार आतुर झाला आणि त्यानें तेथें आपलें रेखल्यासारखें सुंदर, मनोहर व विजयी असें सुंदर स्वरूप प्रगट केलें ॥ २ ॥ भगवंतानें चार हात धारण केले होते; पीतांबराची त्यानें कास घातली होती; त्याच्या वक्षःस्थळावर श्रीवत्सलांछन शोभत होतें. शंख, चक्र, गदा, पद्म हीं चार आयुधें त्यानें हातांत धारण केलीं होतीं व कंठामध्यें कौस्तुभ, वनमाला इत्यादि अलंकार घातले होते· तशींच किरीट, कुंडलें, कडीं, तोडे, कटिबंध, मौक्तिकमाळा, भुजबंद, पोच्या, नूपुरें इत्यादि नाना प्रकारचे रत्नजडित दागदागिने ठिकठिकाणीं शोभत असल्यामुळें, ती मूर्ति नयनमनोहर दिसत होती. आणखी त्याची अंगकांति व रत्नाची प्रभा ह्यांच्या दिव्य तेजानें जिकडेतिकडे चकचकाट झाला होता. ती मूर्ति त्या यज्ञांतील ऋत्विज, सदस्य आणि गृहपति ह्यांच्या दृष्टीस पडली, तेव्हां त्यांस जन्मदरिद्याला द्रव्यनिधि सांपडावा त्याप्रमाणें आनंद झाला. त्या सर्वांनीं तिच्या चरणावर मस्तकें ठेविलीं व अर्घ्यपाद्यादि पूजासामग्री घेऊन षोडशोपचार पूजा करून सद्गदित अंतःकरणानें स्तुतिपाठ करण्यास आरंभ केला ॥ ३ ॥

ऋत्विज म्हणाले,—हे ईश्वरा, तूं सर्वांगपरिपूर्ण आहेस, तरी आमच्यासारख्या तुझ्या भक्तांनीं केलेली पूजा तूं प्रेमभावानें ग्रहण करतोस. तुझी यथावत् स्तुति करण्याचें सामर्थ्य आमच्यासारख्यांच्या अंगीं कोठून असणार ? तुला नमस्कार असो, एवढेंच वारंवार म्हणावयास आम्हांला साधूंनीं पढवून ठेविलें आहे. कोणाचेंहि यथातथ्य स्वरूप कळावें तेव्हांच त्याची यथायोग्य स्तुति होणार, आणि तुझें स्वरूप तर कळण्यासारखें नाहीं. मनुष्यांची बुद्धि मायेपासून झालेल्या गुणांमध्येंच गुरफटलेली असते. त्यामुळें त्याला तुझी यथायोग्य स्तुति करतां येणें शक्य नाहीं. तूं प्रकृतिपुरुषाच्या पलीकडे आहेस, मग आमची हीं ठेविलेलीं नामें व डोळ्यांस दिसणारीं रूपें तुझ्यापर्यंत पोंचणार कशीं ? ह्या ऐहिक नामरूपांनीं तुझ्या स्वरूपाचें वर्णन कोणत्याहि पुरुषाच्या हातून होण्यासारखें नाहीं ॥ ४ ॥ तुझे गुण असंख्य असून उत्तमोत्तम आहेत आणि तुझ्या हजारों भक्तांचीं पातकें नाश करण्याचें त्यांच्या अंगांत सामर्थ्य आहे. ते त्यांना अप्रतिम सुख देणारे आहेत. ह्या

तुझ्या गुणांच्या कांहीं अंशांचें वर्णन फार झालें तर मनुष्याच्या हातून होईल. त्याच्यापेक्षां अधिक त्याच्या हातून कांहींएक होणें शक्य नाहीं ॥ ५ ॥ हे देवा, सद्गदित अंतःकरणानें तुझी कोणी कशीहि स्तुति करो; भक्तिभावानें कोणी उदक दिलें, नव्हे नुसता पाला जरी अर्पण केला, तुळशीचें एक पान तुझ्या मस्तकावर ठेविलें, किंवा दूर्वांचा एखादा कोंवळासा शेंडा जरी तुला अर्पण केला, तरी तूं प्रसन्न होतोस. मात्र तो तुझ्या भक्तांनीं प्रेमळ अंतःकरणानें दिलेला पाहिजे ॥ ६ ॥ आतां या नाभिराजानें विपुल सामग्री महत्प्रयासानें जमवून तुजप्रीत्यर्थ जो एवढा यज्ञसमारंभ मांडला आहे त्याचें विशेष कारण आहे असें आम्हांस वाटत नाहीं. ॥ ७ ॥ कारण कीं हे परमेश्वरा ! आत्मस्वरूपांतच प्रत्यक्ष भावानें अखंड आणि अपरिमित प्राप्त होणारे जे पुरुषार्थ तेंच तुझें स्वरूप होय. तूं सच्चिदानंदरूपच आहेस, पण विषयसुखोपभोगेच्छूंना अशा प्रकारची आराधना करणें हेंच उचित आहे ॥ ८ ॥ हें कसें म्हणशील तर पाहा; हे देवा, तूं किती बरें सर्वश्रेष्ठ व समर्थ आहेस ? सर्व देवाधिदेवांचा अधिपति तो तूं ब्रह्मदेवाची उत्पत्तिहि तुझ्यापासून. तूं समर्थांतला समर्थ आणि आम्ही अज्ञानांत गुरफटल्यामुळें मूढ बनलेलों. आमचें हित कशांत आणि अनहित कशांत, हे सुद्धां आम्हांला कळत नाहीं; परंतु तूं करुणेचा सागर आहेस. तुझ्या मनांत आमच्याविषयीं कळकळ आहे. म्हणूनच आम्ही तुझी पूजा केली, तुझें आवाहन केलें, तरी तूं जणूं काय पूजा केलेली नसावी, आमंत्रण नसावें, तर जणूं काय आदलेंच कार्य समजून एखाद्यानें तांतडीनें यावें त्याप्रमाणें तूं आपण होऊन येथें प्रगट झालास. इतकेंच नव्हे, तर तूं आपल्याजवळ असलेलें श्रेष्ठ स्थान जें मोक्ष तेंही तूं आम्हांस देणार आहेस. ॥ ९ ॥ हे परमपूज्य पुरुषोत्तमा, तूं वरदाता आहेस. ह्या राजर्षीच्या यज्ञामध्यें तूं आम्हां आपल्या भक्तांना दर्शन दिलेंस, हाच तुझा वरप्रसाद होय, असें आम्हीं समजतों ॥ १० ॥ कितीएक ऋषिवर्य सर्वसंगपरित्याग करून आपला ज्ञानाग्नि प्रज्वलित करितात आणि त्याच्या योगानें आपलीं पातकें भस्म करून सोडतात. ते स्वभावानें आणि गुणानें तुझ्याशीं अगदीं सदृश असतात. आत्मस्वरूप हेंच त्यांचें करमणुकीचें स्थान; पण अशा मुनिश्रेष्ठांनाहि अत्यंत कल्याणकारक साधन म्हणून तुझ्या गुणांचें वर्णन करणेंच भाग पडतें. कारण, तुझें दर्शन अत्यंत दुर्लभ आहे. तें त्यांनासुद्धां घडत नाहीं; म्हणूनच ते तुझे गुणानुवाद गायन करून त्याचाच अभ्यास करितात ॥ ११ ॥ तूं आम्हांस दर्शन देऊन पावन तर केलेंस, म्हणून आतां तुझ्यापाशीं आम्हीं एक मागणें मागून घेतों. तें हेंच कीं, आमचें मन गोंधळांत पडलेलें असो, आम्हांला क्षुधा लागलेली असो, आम्हांला जांभई येत असो किंवा कोणतेंही संकट आलें असो, ज्वरानें शरीर संतप्त झालेलें असो, अथवा अंतकाळाचा समय प्राप्त झालेला असो, तुझ्या नांवांचें आम्हांस स्मरण घडावें ह्यासाठीं तुझ्या गुणांवरून जीं जीं तुला नांवें पडलेलीं आहेत तीं तीं आमच्या मुखांत येवोत. कारण, तीं सर्व आमच्या पातकांचा नाश करणारीं आहेत. ॥ १२ ॥ पण ह्याशिवाय दुसरें आणखी एक तुझ्यापाशीं आमचें म्हणणें आहे. नाभिराजाला अशी इच्छा आहे कीं, ' आपल्याला पुत्र व्हावा, आणि तो तुझ्यासारखा व्हावा, '

वास्तविक विचार केला तर तूं पाहिजे तीं सुखें, स्वर्ग, हें तर काय पण मोक्ष देण्यासहि समर्थ आहेस. असें असतां हें सर्व सोडून देऊन राजा पुत्राचीच इच्छा करतो व त्यांतच काय तो सारा पुरुषार्थ भरला आहे असें समजतो. जसें काय एखाद्या दरिद्री मनुष्यानें कुबेरापाशीं मूठभर कोंडा किंवा कण्या मागाव्यात त्याचप्रमाणें तो तुझी ह्या वराविषयीं प्रार्थना करीत आहे ॥ १३ ॥ ह्या राजानें अशी क्षुद्र मागणी मागितली तर त्यांत मोठेंसें आश्चर्य तें काय ? कारण हे देवा ! तुझी माया ही अशीच विचित्र आहे. ती कोणालाच हार जावयाची नाहीं व तिची गति कोणालाहि कळत नाहीं. ह्या संसारामध्यें तुझ्या मायेनें ज्याचा पराभव केला नाहीं, ज्याची बुद्धि कुंठित केली नाहीं, विषयरूप विष ज्याच्या प्रकृतींत भिनलें नाहीं, असा एक तरी पुरुष आढळेल काय ? संतचरणाची सेवा हातून घडेपर्यंत ह्या तुझ्या मायेच्या फेऱ्यांतून कधींच कोणी सुटावयाचा नाहीं ॥ १४ ॥ हे देवाधिदेवा, तूं सर्व ब्रह्मांडाचा चालक आहेस. तुझ्यामागें अनेक कार्ये आहेत, असें असतां आम्हीं तुझें ह्या यःकश्चित कार्याकरितां आवाहन केलें ! ह्या तुझ्या अवहेलनेबद्दल तूं आम्हांस आपल्या समदृष्टीनें क्षमा करणेंच योग्य आहे; कारण आम्हीं बोलून चालून मंद व अज्ञ आहोंत आणि म्हणूनच आम्हांला संतति होणें ह्यांत पुरुषार्थ वाटतो ॥ १५ ॥

शुकाचार्य म्हणाले,—हे राजा, नाभिराजानें ज्यांना पूज्य मानिलें होतें त्या महाऋत्विजांनीं भगवंताच्या चरणांस वंदन करून अशा प्रकारची स्तुति केली. तेव्हां तो देवाधिदेव सुप्रसन्न होऊन त्यानें उत्तर देण्यास आरंभ केला ॥ १६ ॥

भगवान् म्हणाले,— हे ऋषि हो, तुमचीं भाषणें कधींच मिथ्या होणारीं नव्हत. आतां ह्या राजानें माझ्याचसारखा आपल्यास पुत्र व्हावा असा जो वर मागितला तो दुर्घट तर आहेच; कारण माझ्यासारखा दुसरा येणार कोठून ? माझ्यासारखा काय तो एक मीच; तथापि ब्राह्मणांचा आशीर्वाद कधीं व्यर्थ व्हावयाचा नाहीं. कारण, ब्राह्मण हे तीन जातींमध्यें श्रेष्ठ असून तेच माझें मुख होत ॥ १७ ॥ ह्याकरितां माझ्यासारखा दुसरा जर कोणीच नाहीं, तर ह्या आग्नीध्रपुत्र नाभिराजाच्या पोटीं मलाच अंशावतार घेऊन येणें भाग आहे ॥ १८ ॥ शुकाचार्य म्हणाले.—हे राजा, मेरुदेवीहि तेथेंच होती. तिच्या समक्षच तिच्या पतीला असा हा वर देऊन भगवान् अंतर्धान पावले ॥ १९ ॥ हे परीक्षितराजा, ह्याप्रमाणें त्या यज्ञामध्यें महान् महान् ऋषींनीं परमेश्वराला प्रसन्न करून घेतलें असतां त्या भगवंतानें त्या नाभिराजाचे मनोरथ पूर्ण करण्यासाठीं त्याची पत्नी जी मेरुदेवी तिच्या उदरीं शुद्ध सत्यात्मक अवतार स्वतः धारण केला. कारण, वायु भक्षण करणारे लोक, तपश्चर्या करणारे लोक व नैष्ठिक ब्रह्मचारी ह्यांचे धर्म काय ते भगवंतांना सर्व लोकांस दाखवून द्यावयाचे होते ॥ २० ॥

**तिसरा अध्याय समाप्त**

---

# अध्याय ४ था

---

शुकाचार्य म्हणाले,—हे राजा, नाभिराजाच्या या पुत्राच्या हस्तपादादि अवयवांवर जन्मतःच वज्र, अंकुश, ध्वज वगैरे भगवंताचीं चिन्हें दिसूं लागलीं व तो जसजसा थोर होत चालला, तसतशी त्याची समता, शांति, वैराग्य वगैरे सद्गुणहि अधिकाअधिक विकसित होत चालले. हें पाहून राजाचें मंत्रिमंडळ, प्रजाजन, ब्राह्मण व देवता ह्या सर्वांनांच असें वाटूं लागलें कीं, ह्या मुलानें आतां सर्व पृथ्वीचें राज्य करावें ॥ १ ॥ त्याचें शरीर इतकें दिव्य होतें कीं, त्यावर कितीएक कवींनीं काव्यें लिहिलीं. त्याचा प्रभाव, बळ, संपत्ति, कीर्ति, वीर्य, शौर्य इत्यादि सारेच गुण अद्‌भुत दिसूं लागले म्हणून त्याच्या पित्यानें त्याचें नांव ऋषभ म्हणजे श्रेष्ठ असेंच ठेविलें ॥ २ ॥ परंतु हें ऋषभ-देवाचें ऐश्वर्य व भरभराट पाहून भगवान् इंद्राच्या मनांत त्याच्याबद्दल हेवा उत्पन्न झाला. म्हणून तो त्याच्या खंडांत मुळींच पर्जन्य पाडीनासा झाला हें इंद्राचें कपट ऋषभदेवानें तात्काळ ताडलें. कारण त्याचें योगसामर्थ्य केवळ अद्‌भुत होतें. त्यामुळें त्यानें आपल्या मायेच्या प्रभावानें आपल्या 'अजनाभ' नामक खंडावर पाऊसच पाऊस करून टाकला ॥ ३ ॥ नाभिराजाला आपल्या मनाप्रमाणें पुत्र झालेला पाहून अत्यानंद झाला. त्याचें मुखावलोकन करितांक्षणींच त्याचा कंठ प्रेमानें भरून येत असे. वास्तविक पाहिलें तर भगवान् आदिनारायणच आपल्या इच्छेनें त्याच्या घरीं मनुष्यरूपानें जन्मास आला होता, परंतु मायापाशानें बद्ध झाल्यामुळें राजाच्या बुद्धीला तो आपलाच पुत्र असें वाटत असे. तो त्याला 'बाळा वत्सा' अशा कौतुकानें हांका मारूनच त्याचें लालनपालन करी व त्यांतच त्याला आनंद वाटे ॥ ४ ॥ नाभिराजा प्रजेच्या मताला फार मान देत असे. त्याला असें कळून आलें कीं, आपल्या पुत्रावर सामान्य लोकांपासून तों आपल्या प्रधानमंडळापर्यंत सर्वांचेंच निस्सीम प्रेम आहे. तेव्हां त्या राजानें आपल्या त्या पुत्राला धर्मानें प्रजेचें संरक्षण करण्याची मर्यादा घालून देऊन व त्यास यथाविधि राज्याभिषेक करून सर्व ब्रह्मवृंदाच्या स्वाधीन केलें आणि स्वतः मेरुदेवीला बरोबर घेऊन तो बदरिका-श्रमीं गेला आणि कोणासहि उपद्रव न होईल अशा तपश्चर्येच्या योगानें आणि समाधीनें नरनारायणनामक भगवान् वासुदेवाची उपासना करीत राहिला. अशा स्थितींत त्याचा बराच कालक्षेप झाल्यानंतर तो जीवन्मुक्त झाला ॥ ५ ॥ हे पांडुपुत्रा परीक्षिता, त्याच्या चरित्राचे दोन श्लोक लोक नेहमीं म्हणत असतात. त्यांतील भावार्थ हा कीं, नाभिराजा हा राजर्षि होता. त्याच्या चरित्राचें अनुकरण कोणत्या तरी मनुष्याच्या हातून घडेल काय? कारण कीं, त्याच्या पवित्राचरणामुळें प्रत्यक्ष परमेश्वरालाच जन्म घेऊन त्याच्या उदरीं यावें लागलें ॥ ६ ॥ ब्राह्मणाचें हित करणाऱ्या नाभिराजाप्रमाणें दुसरा कोणी तरी सांपडेल काय? अहो, त्यानें मंगलोपचारांनीं ब्राह्मणांची पूजा केली म्हणून ब्राह्मणांनीं आपल्या प्रभावानें

त्या राजाला त्या यज्ञाप्रमाणें प्रत्यक्ष विष्णूचें दर्शन करून दिलें ॥ ७ ॥ ऋषभादेव हा आपल्या देशाला कर्मभूमि असें समजत असे; म्हणून त्यानें प्रथम गुरुगृहीं कसें राहावें तें सर्व लोकांस आपण स्वतः तसें वागून शिकवून दिलें. त्यानंतर गृहस्थाश्रमांतले धर्म कसें पाळावेत हें लोकांस दाखविण्याकरितां त्यानें पुढें गृहस्थाश्रमहि धारण केला आणि शास्त्रोक्त रीतीनें श्रुतिस्मृतींत सांगितलेल्या कर्मांचें यथासांग अनुष्ठान करून इंद्रानें दिलेल्या जयंतीनामक भार्येच्या उदरीं आपल्याप्रमाणेंच अशा शंभर पुत्रांस जन्म दिला ॥ ८ ॥ त्याचा सर्वांत वडील पुत्र भरत नांवाचा होता. तो महान् योगी निपजला. त्याच्या सद्‌गुणांची प्रशंसा करावी तेवढी थोडीच. त्याच्यावरून त्याच्या देशाला 'भारत' असें नांव पडलें ॥ ९ ॥ त्याच्या पाठचे भाऊ कुशावर्त, इलावर्त, ब्रह्मवर्त, मलय, केतु भद्रसेन, इंद्रस्पृक् विदर्भ आणि कीकट हे नऊ असून तेच खालच्या सर्व नव्वद भावांत श्रेष्ठ होते ॥ १० ॥ त्या उरलेल्यांपैकीं कवि, हरि, अंतरिक्ष, प्रबुद्ध, पिप्पलायन, आविर्होत्र, द्रुमिल, चमस व करभाजन हे नऊ पुत्र श्रेष्ठ भगवद्भक्त होते. त्यांनीं सर्व लोकांना भागवतधर्म दाखवून दिले. त्यांचें भगवद्गुणानुवर्णनानें भरलेलें उत्तम चरित्र म्हणजे शांतीचें निवासस्थान होय. त्यांचें वर्णन वसुदेव आणि नारद ह्यांच्या संवादरूपानें आम्हीं करूं * ॥ ११ ॥ १२ ॥ भगवान् ऋषभदेव हा आत्मविवेकानें चालणारा होता. संसारापासून उत्पन्न होणाऱ्या अनेक अडचणी त्याच्या ठिकाणीं निवृत्त झालेल्या होत्या; म्हणून तो चिदानंदस्वरूपी ईश्वराप्रमाणेंच होता. तरीसुद्धां ज्यांना धर्माचें रहस्य कळत नाहीं; त्यांना कालपरंपरेनें चालत आलेला धर्म त्यानें स्वतः आचरण करून दाखवून त्यांना शिकविण्यासाठीं तो स्वतःहि अज्ञान्याप्रमाणें कर्माचरण करूं लागला ॥ १३ ॥ त्यानें आपली दृष्टि शांत व सर्वत्र सम अशी ठेविली, सर्वांशीं स्नेह जोडिला, प्राणिमात्रांविषयीं कळकळ बाळगली आणि धर्म, अर्थ, कीर्ति, प्रजा, भोग आणि मोक्ष संपादन करून लोकांना सदाचाराचे नियम लावून दिले ॥ १४ ॥ कारण मोठमोठे लोक जसें आचरण करितात, त्याप्रमाणें बाकीचे लोक आचरण करीत असतात ॥१५॥ वेदांमध्यें भरलेलें सर्व रहस्य ऋषभदेव जरी पूर्णपणें जाणत होता, तरी प्रत्येक कार्यांत तो ब्राह्मणांचीच अनुज्ञा घेऊन सर्व प्रजेचें पालन करीत असे ॥ १६ ॥ त्यानें ब्राह्मणांच्या आज्ञेनुसार सर्व यज्ञांचें शंभर वेळां अनुष्ठान केलें. त्याच्या प्रत्येक समारंभांत द्रव्य, स्थल, काल, वय, परमेश्वराविषयीं निष्ठा, ऋत्विज् इत्यादि नाना प्रकारच्या साहित्यांची समृद्धि असे ॥ १७ ॥ भगवान् ऋषभदेव ह्या भरतखंडाचें पालन करीत असतां कोणालाहि इतरांपासून आपणास कांहीं प्राप्त व्हावें अशी कधीं इच्छा होत नसे; आणि कोणताही प्राणी आशाळभूतपणानें कशाकडेहि पाहात नसे. तरी पण आपल्या राजावरचें आपलें प्रेम घटकोघटकीं वाढावें अशी मात्र सर्वांची इच्छा असे ॥ १८ ॥ एके दिवशीं ऋषभदेव फिरत फिरत ब्रह्मावर्तास गेला तों तेथें मोठमोठ्या महर्षींची मोठी सभा भरली होती. सारी प्रजा राजाचें दर्शन

---

* हें पुढें अकराव्या स्कंधांत आलें आहे.

घेण्यासाठीं एकत्र जमली होती. तें पाहून राजाच्या मनांत असें आलें कीं, आपल्या साऱ्या पुत्रांचीं अंतःकरणें आपल्या स्वाधीन आहेत, आणि लीनता व प्रेम येणेंकरून त्याचें वर्तनहि अत्यंत व्यवस्थित आहे. तरीसुद्धां अशा वेळीं आपण कांहीं तरी त्यांस उपदेशपर चार शब्द सांगावे, म्हणजे त्यांच्या निमित्तानें तोच हितोपदेश लोकांनाहि सहजीं ऐकावयास मिळेल. अशा विचार करून त्यानें बोलण्यास आरंभ केला ॥ १९ ॥

**चौथा अध्याय समाप्त**

# अध्याय ५ वा

ऋषभ म्हणाला,—मुलांनो, ह्या जगामध्यें यातायात केली म्हणजे विष्ठा भक्षण करणाऱ्या कृमिकीटकांना सुद्धां विषयभोगहे भोगावयास मिळतात. हे विषयसुख प्रारंभीं जरी सुखदायक असें वाटतें, तरीं परिणामीं तें दुःखदायकच होतें. ह्याकरितां मनुष्यानें त्या कृमिकीटकांप्रमाणें विषयोपभोगांतच लोळत राहाणें उक्त नव्हे, म्हणून तुम्हीं तपाचरण करा; म्हणजे तुमच्या अंतःकरणाची शुद्धि होईल आणि अंतःकरण शुद्ध झालें म्हणजे अखंड ब्रह्मानंदाचा लाभ होईल ॥ १ ॥ साधूंची सेवा हें मोक्षाचें द्वार असून स्त्रैणपुरुषांचा सहवास हें नरकाचें साधन होय, असें म्हणतात. ज्यांची दृष्टि सम, अंतःकरणवृत्ति अत्यंत शांत, क्रोध ज्याला माहीतच नाहीं, सर्वांशीं ज्याची मैत्री आणि ज्याचें आचरण पवित्र तोच साधु असें समजावें ॥ २ ॥ किंवा मी जो ईश्वर त्या ठिकाणीं प्रेम ठेवणें हाच काय तो पुरुषार्थ असें जे समजतात व जे केवळ उदरनिर्वाहाच्या गोष्टी सांगणारे असतील त्यांच्या-वर किंवा स्त्रीसुतधनानें भरलेल्या घरादारावर जे प्रेम न करतां शरीरनिर्वाहापुरताच जनाशीं संबंध ठेवतात, तेच सत्पुरुष होत ॥ ३ ॥ मनुष्य इंद्रियसुखाच्या मागें लागला, कीं तो प्रमत्त बनतो. मग त्याच्या हातून पातकें घडतील यांत आश्चर्य तें काय ? मुलांनो, मिथ्याअसूनहि दुःखदायक असा हा देह ज्या पातकांमुळें आत्म्याला प्राप्त होतो, तेंच पातक पुनरपि आचरण करणें हें कांहीं ठीक नव्हे ॥ ४ ॥ आत्मस्वरूपाचें ज्ञान झालें नाहीं, तोंपर्यंत आत्मा हा अज्ञानानें आच्छादिलेला असतो व तोच त्याचा पराजय होय आणि तोंपर्यंत मन हें कर्मांकडे प्रवृत्त होतच असतें. कारण तें नेहमीं कर्मोत्सुक असतें आणि त्यामुळेंच शरीराला बंधन प्राप्त होतें ॥ ५ ॥ आत्म्याला अज्ञानानें आच्छादून टाकिलें म्हणजे, पुरुषाला कर्मबंधांत पाडतें. मी जो जगन्निवास परमेश्वर त्यावर जोंपर्यंत पुरुषाचा शरिराशीं असलेला संबंध सुटावयाचा नाहीं ॥ ६ ॥ इंद्रियजन्य सुख हें मिथ्या आहे, हें जर मनुष्यानें जाणलें नाहीं, आणि स्वार्थानेंच तो धुंद झाला, तर त्या मूढाला आत्मस्वरूपाचा विसर पडतो आणि तो मैथुनसुखप्रधान गृहांतच गुरफटून जाऊन नाहीं नाहीं ते ताप भोगीत असतो ॥ ७ ॥ कोणत्याहि मनुष्याच्या हृदयामध्यें अहंकाररूपी मनाची गांठ ही असतेच. त्यामुळें ' हा मी आणि हीं माझीं इंद्रियें ' असा अभिमान त्याला वाटत असतो; परंतु सुखोपभोगार्थ स्त्रीचा अंगीकार केला कीं, त्याच्यायोगें तेथें दोन अभिमान उत्पन्न होतात. कारण विवाहित स्थितीमध्यें पतीची आणि पत्नीची अशा दोन ग्रंथी एकत्र होतात. त्यामुळें त्या पुरुषाला घरदार, शेतवाडी, मुलेंबाळें, आप्तइष्ट हा विषय भिन्न असूनहि त्याच्याविषयीं अहंममता उत्पन्न होते; आणि त्याच्याबद्दल प्रबळ मोह उत्पन्न होऊन त्याच्या दुःखाला तो कारण होतो ॥ ८ ॥ ह्या पूर्वकर्मानुसार हृदयाशीं जखडून बसलेली जी ही अहंकाराची गांठ, ती जेव्हां शिथिल होते, तेव्हां स्त्रीवरील ममताहि आपोआप

कमी होतें; आणि तो विषयसुखापासून पराङ्मुख होतो, तेव्हांच तो अहंकाराच्या बंधनापासून मुक्त होऊन परम पदाला पोंचतो ॥ ९ ॥ हा अहंकार सुटण्याला २५ साधनें सांगितलेलीं आहेत, तीं अशीं —( १ ) हंसरूपी ( परमेश्वर ) गुरु जो मी, त्या माझ्यावर भक्ति ठेवणें, ( २ ) माझ्या सेवेंत तत्पर राहाणें, ( ३ ) भोगेच्छा सोडून देणें, ( ४ ) शीतोष्ण, मानापमान इत्यादि द्वंद्वें टाकून देणें, ( ५ ) प्राणिमात्रांना इहलोकीं म्हणा कीं परलोकीं म्हणा दुःख हें आहेच आहे हें लक्षांत ठेवणें, ( ६ ) ज्ञानाची इच्छा धरणें, (७) तपश्चर्या करणें व आत्मसंयमन करणें, ( ८ ) काम्यकर्में सोडून देणें, ( ९ ) कर्में करावयाचीं तीं मत्प्रीत्यर्थच करणें, ( १० ) निरंतर माझे गुणानुवाद गायन करणें, ( ११ ) मद्रूप झालेल्या लोकांची संगति धरणें, ( १२ ) माझे गुण वर्णन करणें, ( १३ ) निर्वैर असणें, ( १४ ) समदृष्टि ठेवणें, ( १५ ) शांति धारण करणें, ( १६ ) घरादारावरील व देहावरील ममता सोडणें, ( १७ ) अध्यात्मशास्त्राचा अभ्यास करणें, ( १८ ) एकांतवासाची आवड धरणें, ( १९ ) प्राण, इंद्रियें आणि मन ह्यांना पूर्णपणें स्वाधीन ठेवणें ( २० ) सत्यावर निष्ठा ठेवणें, ( २१ ) ब्रह्मचर्य पाळणें ( २२ ) कर्तव्यकर्मास कधींहि न चुकणें, ( २३ ) इंद्रियदमन करणें, ( २४ ) सर्वत्र मीच भरलेला आहें अशी दृष्टि करून देण्यांत कुशल असें ज्ञान व विज्ञान संपादन करणें आणि ( २५ ) योगाभ्यास करणें. अशा रीतीनें धैर्य धरून प्रयत्नपूर्वक विवेक करूं लागलें म्हणजे त्या कुशल पुरुषाचा अहंकाररूप उपाधि दूर होतो ॥ ११ ॥ १२ ॥ १३ ॥ अज्ञानापासून होणारें हें ग्रंथिबंधन म्हणजे कर्मांचें एक वसतिस्थानच होय. ह्याकरितां कोणत्याहि पुरुषानें सावध राहून शास्त्रांत सांगितलेल्या ह्या उपायाचें अनुष्ठान करावें आणि ही गांठ निखालस सोडवून टाकावी. ती सुटली म्हणजे मग साधनाचें अनुष्ठान करण्याचें कारण राहात नाहीं ॥१४॥ ज्या राजाला किंवा गुरूला माझा लोक प्राप्त व्हावा अशी इच्छा असेल किंवा माझा अनुग्रह म्हणजेच पुरुषार्थ हें ज्याला मान्य असेल, त्यानें आपापल्या प्रजांना, पुत्रांना किंवा शिष्यांना असाच उपदेश करावा आणि तो उपदेश त्यांनीं मान्य केला नाहीं तरी यत्किंचित्‌हि मनांत क्रोध आणूं नये. खरें तत्त्व न समजल्यामुळें कर्म करणें हेंच कल्याणकारक आहे असें समजून जे कर्ममूढ बनलेले असतात त्यांना आपणहि आणखी कर्ममार्गांत पाडूं नये. कोणालाहि कर्ममार्गास लावणें म्हणजे आंधळयाला खड्डयांत लोटण्यासारखें असल्यामुळें तसें करण्यांत अर्थ कोणता ? ॥ १५ ॥ आपलें कल्याण कशांत आहे हेंच आधीं लोकांना समजत नाहीं. भोगेच्छा अनिवार झाली कीं ते कर्में करूं लागतात. त्यासाठीं त्यांना परस्परांशीं वैर करणें भाग पडतें आणि त्या मूर्खांना राईयेवढ्या सुखासाठीं डोंगराएवढीं दुःखें भोगावीं लागतात हेंहि कळत नाहीं ॥ १६ ॥ सत्य तत्त्व ज्याला समजून चुकलें व ज्याच्या हृदयामध्यें दयेची निरंतर वस्ती आहे, असा विचारी पुरुष अविद्येमध्यें लोळत पडत असलेल्या जीवाला पुनः कर्ममार्गास कसें प्रवृत्त करील ? कारण, कर्म करणें ही कुबुद्धि होय, हें समजत असूनहि पुनः मनुष्याला त्याच मार्गानें जा म्हणणें म्हणजे वाट चुकलेल्या आंधळयाला तसाच

पुढें जा असेंच म्हणण्यासारखें आहे ॥ १७ ॥ आपल्या आश्रितास मृत्युरूप संसारांतून काढण्याचें ज्याला सामर्थ्य नसेल तो गुरूच नव्हे; तसाच तो बंधु नव्हे व पिता किंवा मातादि त्याला म्हणूं नये. त्याला दैवतहि म्हणतां येत नाहीं आणि स्वामी किंवा पालकहि तो नव्हे ॥ १८ ॥ हें माझें शरीर तुमच्या कल्पनेच्या बाहेर असून मूर्तिमंत धर्मस्वरूप आहे. त्यामुळें सत्त्वगुण हेंच माझें हृदय होय. अधर्माला मी सर्वस्वीं पाठीमागें टाकिल्यामुळें मला आर्यलोक ' ऋषभ ' म्हणजे ' श्रेष्ठ ' असें म्हणतात ॥ १९ ॥ पुत्र हो, तुम्ही माझ्या पवित्र व सत्त्वसंपन्न हृदयापासून उत्पन्न झालां आहां. म्हणून तुम्हीं तुमचा हा सहोदर वडील बंधु जो भरत ह्याची निष्कपटबुद्धीनें सेवा करा. त्याची शुश्रूषा करण्यानें प्रजापालनाचें कार्य होणारें आहे ॥ २० ॥ ह्या स्थावरजंगमात्मक सृष्टीमध्यें स्थावरापेक्षां जंगम पदार्थ श्रेष्ठ होत; परंतु त्यापेक्षां जे सचेतन म्हणजे ज्ञान असणारे पशुपक्षी, कृमिकीटक हे श्रेष्ठ होत. त्या सर्वांपेक्षां मनुष्य श्रेष्ठ, मनुष्यांपेक्षां प्रमथ श्रेष्ठ, प्रमथांपेक्षां गंधर्व श्रेष्ठ, त्यांच्याहून देवांचे किन्नरादि सेवकगण श्रेष्ठ होत ॥ २१ ॥ त्यांच्यापेक्षां दैत्य श्रेष्ठ, दैत्यांपेक्षा इंद्रादिदेव थोर, इंद्रादिदेवांपेक्षां ब्रह्मदेवाचे दक्षआदिकरून पुत्र ते श्रेष्ठ, होत. त्यांच्यापेक्षां शंकर श्रेष्ठ, त्यालासुद्धां ब्रह्मदेवापासूनच सामर्थ्य प्राप्त झालें असून तो मलाच परमेश्वर समजतो. आणि मी ब्राह्मणांना पूज्य मानितों ॥ २२ ॥ हे ब्रह्मवृंद हो, ह्या जगांत ब्राह्मणांची बरोबरी कोणालाच व्हावयाची नाहीं. याहून अधिक काय सांगूं ? ह्यांच्या मुखामध्यें श्रद्धापूर्वक जें अन्न अर्पण केलें असेल, तें भक्षण करून मला जसा संतोष होतो, तसा अग्निहोत्रांत हवन केलेल्या हविर्द्रव्यांच्या भक्षणानेंहि होत नाहीं ॥ २३ ॥ कारण त्यांनींच माझ्या वेदरूपी सुंदर दिव्य व पुरातन शरिराचें ह्या लोकीं आजपर्यंत संरक्षण केलें आहे. त्यांच्यामध्यें अत्यंत पवित्र असा सत्त्वगुण, शम, दम, सत्य, अनुग्रह, तप सहनशीलता आणि अनुभव हे आठ गुण वसत असतात ॥ २४ ॥ ब्राह्मण निष्कांचन असतांहि स्वर्ग आणि मोक्ष यांचा अधिपति सर्वश्रेष्ठ असा परमेश्वर जो मी त्याच्यापासूनहि ते कसलीहि अपेक्षा करीत नाहींत, मग ते इतरांपाशीं काय मागणार ? रात्रंदिवस माझी भक्ति करणें एवढेंच काय तें त्यांचें व्रत असतें ॥ २५ ॥ मुलांनो, तुम्ही पावलोंपावलीं आपल्या मनांत अशी भावना ठेवा कीं, मी परमेश्वर हा सर्व चराचरमात्रांत भरून राहिलों आहें. तुमची दृष्टि पवित्र असूंद्या म्हणजे हीच माझी परमेश्वराची खरी पूजा होय ॥ २६ ॥ मन, वाणी, दृष्टि इत्यादि इंद्रियांचें प्रत्यक्ष फळ म्हणजे माझी उपासना करणें हेंच होय. त्यावांचून मनुष्याची प्रचंड मोहरूपी काळपाशांतून सुटका होणें शक्यच नाहीं ॥ २७ ॥

शुकाचार्य म्हणाले, —हे राजा, त्या भगवान् ऋषभदेवाचें सामर्थ्य अगाध असून सर्व लोकांवर त्याचें पराकाष्ठेचें प्रेम असे ; म्हणूनच त्यांनीं हा आपल्या पुत्राच्या निमित्तानें साऱ्या जनांस कळकळीचा उपदेश केला. कारण, आपल्या पुत्रांना त्यांनीं पूर्वींच सुरक्षित करून ठेविलें होतें; पण येवढ्यानेंच त्याची तृप्ति झाली नाहीं व स्वभावांत अत्यंत शांति

प्राप्त झाल्यानें जे कर्ममार्ग सोडून देतात त्यांचें परमहंसस्थितींतील धर्म कसे असतात, त्यांचें भक्ति, ज्ञान व वैराग्य कसें असतें, हेंहि लोकांना दाखवून द्यावें असें त्याच्या मनांत आलें. यासाठीं आपल्या शंभर पुत्रांतील वडील, भगवद्भक्त आणि भगवद्भक्ताची सेवा करण्यांत तत्पर असा जो भरत त्याला त्यांनीं राज्याभिषेक करून पृथ्विसंरक्षणाचें काम सांगितलें आणि स्वतःजवळ देहाशिवाय कांहीं राखून ठेविलें नाहीं. इतक्या दिवस तो आपल्या घरांतच वेड्यापिशासारखा, दिगंबर, केस अस्ताव्यस्त पसरलेले अशा स्थितींत राहत असे, पण आतां त्यानें आहवनीय अग्नीचा आपल्या आत्म्यांतच समावेश केला आणि संन्यास घेऊन तो ब्रह्मावर्तातून निघाला ॥ २८ ॥ तो एखाद्या आळशासारखा, आंधळ्यासारखा, मुक्यासारखा, बहिऱ्यासारखा किंवा पिशाचानें झपाटलेल्या मनुष्यासारखा फिरत असे. त्याचा वेष सर्वसंगपरित्याग• केलेल्या वैराग्यासारखा होता आणि लोकांनीं त्याला कितीहि प्रश्न विचारिले तरी मौनव्रत स्वीकारून तो मुकाट्यानेंच चाले ॥ २९ ॥ जातां जातां त्याला मोठमोठीं शहरें, गांव, खाणी, खेडीं, फुलांच्या बागा, डोंगरांच्या पायथ्यांचे गांव, सैन्याचे तळ, गोठे, गौळवोडे, व्यापाऱ्यांचे तांडे, डोंगर, वनें, आश्रम इत्यादि मार्गामध्यें लागत आणि ठिकठिकाणचे नीच लोक, जंगली हत्तींच्या भोंवतीं जशा माश्या घोंगावतात, त्याप्रमाणें त्याला भंडावून सोडीत. ते त्याला धाक दाखवीत, मारीत, त्याच्या अंगावर लघुशंका करीत, त्याच्यावर थुंकत, खाकरे टाकीत, दगड, विष्ठा किंवा धूळ त्याच्या अंगावर फेंकीत ! कोणी त्याच्यापुढें अपानवायु सोडीत व त्याला नाहीं नाहीं त्या शिव्या देत. तरी त्यांच्याकडे लक्ष न देतां देहाची रचनाच मुळीं खोटी आहे व त्याला भ्रमामुळें सत् असें म्हणतात असें जाणून त्यानें देहावर, मी किंवा हा माझा, असा भाव मुळींच ठेविला नव्हता. सत् व असत् ह्या दोन्ही अनुभवांनीं तो स्वस्वरूपीं स्थिर होऊन राहिला असल्यामुळें त्याचें मन आत्मानंदापासून ढळत नसे. अशा स्थितींत तो एकटाच साऱ्या पृथ्वीवर भ्रमण करी ॥ ३० ॥ त्याचे हात, पाय, वक्षःस्थळ, स्थूल बाहू, खांदे, गळा, मुख वगैरे अवयवांची रचना अत्यंत नाजुक होती. त्याच्या मुखावर नित्य सुंदर हास्य होत असे, त्यामुळें तें फार शोभिवंत दिसे. नेत्र ताज्या कमलपत्रांसारखे पाणीदार असून थोडेसे आरक्त व दीर्घ होते. त्यांतील बुबुळें तर अत्यंत शांत असून त्यांच्यायोगानें तो फारच रमणीय दिसे. त्याचे गाल, कान, कंठ व नाक हे अवयव त्याच्या सर्व शरिरास शोभण्यासारखे नीटनेटके असत व त्याच्या मुखावर साहजिक रम्य हास्य असल्यामुळें प्रत्येक गांवातील स्त्रियांच्या अंतःकरणांत त्याला पाहून कामसंचार होत असे. त्याच्या पाठीवर कुरळ्या झुबकेदार पिंगट केंसांचा मोठा भार लोंबत होता. तो इतका सुंदर होता, तथापि त्याचें शरीर एखाद्या नंग्या गोसाव्याप्रमाणें मळकट असल्यामुळें त्याला कोणी तरी पिशाचानें झपाटलें असावें असें वाटे ॥ ३१ ॥ भगवान् ऋषभदेवाला असें जेव्हां दिसलें, तेव्हां त्यानें प्रतिबंध करण्याचा उपाय करावा तर तो सर्वथैव निंद्य होय असें समजून त्यानें अजगरव्रत पतकरलें. आपलें प्रारब्धकर्म असेल तें भोगावयाचें असा निश्चय करून तो पडल्यापडल्याच जें मिळे तें खाई. त्याचें खाणें, पिणें, मलमूत्रविसर्जन हें एकाच ठिकाणीं होत असे. तो विष्ठेमध्येंच लोळे,

म्हणून त्याच्या अंगावर मळाचीं पुटेंच्या पुटें चढलेलीं होतीं ॥ ३२ ॥ त्याच्या मळाला दुर्गंध तर येत नव्हताच; पण उलट दाही दिशांना त्याचा सुगंध सुटे. तो इतका कीं, त्याच्या संसर्गामुळें सुगंधयुक्त झालेल्या वायूनें तेथील सभोंवतालचा दहा योजनांइतका प्रदेश सुगंधित होऊन जात असे ॥ ३३ ॥ याप्रमाणें तो गाई, हरणें, कावळे ह्यांच्याप्रमाणें चाले, बसे, निजे आणि त्याच्याप्रमाणेंच पाणी पिई, खाणें खाई, मूत्रपुरीषोत्सर्ग करी ॥ ३४ ॥ भगवान् ऋषभदेवानें अशा प्रकारचा योगमार्ग स्वीकारला. तो मोक्षाचा अधिपति होता. अखंड स्वरूपामध्येंच निमग्न असून सदासर्वदा परमानंदाचा अनुभव घेत असे. श्रुतींत सर्वांत मोठा परमानंद म्हणून जो वर्णिला आहे, तेंच त्याचें मूर्तिमंत स्वरूप होय. सर्व भूतांचा आत्मा, षड्गुणैश्वर्यसंपन्न जगन्निवास जो परमात्मा त्याच्यांत आणि ऋषभदेवांत उदररूपी किंवा देह हा भेदक उपाधि नव्हता. सर्व प्रकारचीं फळें त्याच्याजवळ निरंतर भरून राहिलीं होतीं. हे राजा, फार काय सांगावें ? योगाभ्यास करीत असतां त्याला आकाशांतून फिरणें, मनास येईल तेथें तत्काल जाणें, अकस्मात् गुप्त होणें, दुसऱ्या देहांत संचार करणें, दूरचा पदार्थ दिसणें इत्यादि प्रसिद्ध असलेल्या अष्टसिद्धि अनायासें हस्तगत झालेल्या होत्या; पण तो त्यांत कधींहि धन्यता मानीत बसला नाहीं ॥ ३५ ॥

**पांचवा अध्याय समाप्त**

---

# अध्याय ६ वा



परीक्षित्राजा शुकाचार्यांना म्हणतोः— हे ज्ञानसंपन्न मुने, ऋषभ देवर्षि तर आत्मस्वरूपांतच तल्लीन होऊन राहिलेला होता. योगाभ्यासाच्या योगानें त्यांचा ज्ञानाग्नि प्रदीप्त होऊन त्यांचीं कामक्रोधादि सर्व कर्मबीजें जळून गेलीं होतीं. अशा प्रकारें ज्यांचीं कर्मबीजें जळून जातात, त्यांना सहजगत्या योगसिद्धि प्राप्त झाल्या तर त्यांच्या ऐश्वर्यापासून त्यांना कांहीं क्लेश होत नाहींत, हा तर सिद्धांत आहे. मग त्यांनीं त्या योगसिद्धीचा स्वीकार कां केला नाहीं ? ॥ १ ॥ शुकाचार्य म्हणाले,—हे राजा तूं म्हणतोस हें खरें आहे; परंतु सावज जाळयांत अडकलें तरीसुद्धां पारध्याला त्याचा पक्का भरंवसा वाटत नाहीं; कारण न जाणों तें कदाचित् तितक्यांतूनहि बाहेर पळ काढील. तद्वत् बुद्धिमान् पुरुषांना ह्या मनाचा पक्का विश्वास कधींच वाटत नाहीं. कारण चंचळपणा हा त्याचा स्वभावधर्म आहे ॥ २ ॥ याविषयीं असें म्हटलें आहे कीं, ह्या चंचळ मनाबरोबर मैत्री अशी कोणी कधींहि करूं नये. ह्या मनावर विश्वास ठेविल्यामुळें आजन्म केलेली शंकराची तपश्चर्या मोहिनी दृष्टीस पडतांच फुकट गेली ॥ ३ ॥ आपल्या पतीचा आपल्यावर विश्वास आहे असें पाहिलें म्हणजे व्यभिचारी स्त्री ज्याप्रमाणें हळूच आपल्या जाराला घरांत घेते, त्याप्रमाणें योग्यानें मनाशीं एक वेळ मैत्री केली कीं, कामवासनेला हृदयांत शिरण्याला मोकळीक देते आणि मागाहून इतरहि सारे शत्रु आपोआप येऊन घरांत घुसतात ॥ ४ ॥ काम, क्रोध, लोभ, मद, मत्सर, शोक, मोह, भय इत्यादि विकार हे पुरुषाचे शत्रु होत आणि कर्मांपासून बंधन प्राप्त होण्याला कारण तरी मनच. अशा या मनाचा विश्वासानें कोणता पुरुष स्वीकार करील ? ॥ ५ ॥ ऋषभदेव हा सर्व लोकपालांना भूषणभूत होता. तरी त्याच्या अंगीं भगवत्प्रभाव आहे हें कोणासच कळत नसे. याचें कारण त्याचा वेष, भाषण, चालचलणूक हीं पूर्वीं सांगितल्याप्रमाणें विचित्र होतीं; पण यापुढें योगी लोक देहत्याग कसा करितात त्याचें ह्या लोकांस शिक्षण द्यावें अशी त्यास इच्छा झाली. त्यासाठीं त्यानें स्वतःच देहत्याग करण्याचें मनांत आणिलें. जीवात्मा आणि परमात्मा, ध्यानकर्ता आणि ध्येय; आधार व आधेय ह्यांतील भेद त्यानें मुळींच सोडून दिला आणि सर्वत्र समदृष्टि ठेवून व विषयाचा संबंध सर्वस्वीं सोडून स्वस्थ राहिला ॥ ६ ॥ हे राजा, मनाचा त्याग केला तरी पुढें कांहीं काळपर्यंत पूर्वींच्या अभिमानाच्या छायेमुळें देह हा चालतच असतो. त्याप्रमाणें ऋषभदेवानें अशा प्रकारें लिंगदेह सोडला तरी त्याचा जड देह पूर्वींच्या अभिमानाभासामुळें योगमायेच्या वासनेनें ह्या पृथ्वीवर फिरत राहिला. तो फिरतां फिरतां सहज कोंक, वेंक, कुटक ह्या देशांत जाऊन पोचला असतां तेथें कांहीं तरी मनांत येऊन तो तोंडांत एक दगडच धरून बसला. त्याचे केस अस्ताव्यस्त पसरले होते व अंगावर कोणत्याहि प्रकारचें आच्छादन नव्हतें. अशा रीतीनें तो उन्मत्तासारखा कुटकपर्वतावरील

अरण्यांत एकटाच भटकत फिरत होता ॥ ७ ॥ पण पुढें त्या अरण्यांत असलेल्या वेळूच्या बेटांतील कांहीं वेळू वाऱ्यानें डुलतडुलत एकमेकांवर घासूं लागले आणि त्या घर्षणानें अग्नि उत्पन्न होऊन त्या अरण्यांत जिकडेतिकडे वणवा पेटला व तो सारीं झाडें-झुडपें ग्रासीत सुटला असतां त्या भयंकर अग्निप्रळयामध्यें ऋषभदेवाच्या देहाचें जळून भस्म झालें ॥ ८ ॥ कोंक, वेंक व कुटक या देशांत अर्हत् ह्या नांवाचा राजा होणार आहे व तो तेथील राज्य चालवील व इतक्यांत ऋषभदेवाचें हें, कोणत्याहि आश्रमाला अनुचित असें अद्भुत चरित्र त्याच्या कानावर जाईल. हे परीक्षित्‌राजा, कलियुगामध्यें अधर्माचा उत्कर्ष होणार हें तर ठरलेलेंच आहे. ह्या भवितव्यतेमुळें अर्हत्‌राजाच्या बुद्धीला मोह उत्पन्न होईल आणि तो राजा ऋषभदेवाच्या चरित्राचें उदाहरण घेऊन व त्याचें अनुकरण करून आपला निर्भय असलेला धर्म सोडून देऊन आपल्याच बुद्धीनें नवीन पाखंडी धर्म स्थापन करून त्यानेंच चालूं लागेल व त्याच निंद्य धर्माचा प्रसार करील ॥ ९ ॥ कलियुगामध्यें लोक हे ईश्वरी मायेनें मोहित असल्यामुळें, अर्हत्‌सारखा अधर्मप्रवर्तक राजा निपजला म्हणजे 'यथा राजा तथा प्रजा' ह्या न्यायानें स्वधर्मांतील शुद्ध आचरण सोडून लोक मनःपूत मलिन आचरण करूं लागतील. स्नान करावयाचें नाहीं, आचमन सुद्धां टाकावयाचें नाहीं, गलिच्छ राहावयाचें, नाना प्रकारचे केस कातरावयाचे, असे आचार स्वीकारतील. कारण हा कलि म्हणजे अधर्माचें केवळ माहेरघर असून तो लोकांच्या बुद्धि भ्रष्ट करून सोडितो. म्हणून लोक, वेद, ब्राह्मण, यज्ञनारायण व इतर पवित्र लोक ह्यांनाही दूषित करून सोडतील ॥ १० ॥ हे लोक या नवीन अर्वाचीन पद्धतीचें अंधपरंपरेनें आचरण करून त्या आपल्या स्वैर आचरणावरच विश्वास टाकिल्या-मुळें शेवटीं त्यांना स्वतःच्याच दोषामुळें अंधनरकांत पडावें लागेल ॥ ११ ॥ हे परीक्षित्-राजा, ऋषभदेवाचा हा अवतार रजोगुणानें व्याप्त झालेल्या लोकांना मोक्षमार्गाचें शिक्षण द्यावें येवढ्याकरितांच परमेश्वरानें घेतला होता. त्याच्या गुणांचें वर्णन करणारे हे लोक त्याची कीर्ति नित्य गातात ॥ १२ ॥ अहो, सप्तसमुद्रवलयांकित पृथ्वीच्या पाठीवर जितकीं म्हणून द्वीपें आहेत, त्या सर्वांमध्यें भारतवर्षाइतकें पुण्यस्थान दुसरें कोणतेंहि नाहीं. कारण ह्या देशांत राहणारे लोक, ऋषभादि अवतारांनीं युक्त अशीं परमेश्वराचीं मंगलचरित्रें गायन करीत असतात ॥ १३ ॥ अहो, प्रियव्रत राजाच्या वंशाची कीर्ति अत्यंत पवित्र होय. कारण त्या वंशामध्यें प्रत्यक्ष आदिनारायणानें अवतार घेऊन कर्मबंधापासून मुक्त होण्याचें साधन अशा मोक्षधर्माचें आचरण करून दाखविलें ॥ १४ ॥ जनांस सन्मार्ग दाखविण्यासाठीं ऋषभदेवानें जे जे यत्न केले, त्याचें अनुकरण करण्याची नुसती इच्छा धरणारा दुसरा एखादा त्याच्यासारखा योगी कोठें तरी आढळेल काय? त्यानें सर्व योगसिद्धि फुकट म्हणून टाकून दिल्या. ज्यांच्यासाठीं इतर योगी मोठा प्रयत्न करीत असतात ॥ १५ ॥ हे परीक्षित्‌राजा, सर्व वेदांचा, लोकांचा, देवब्राह्मणांचा व गायींचाहि परात्पर गुरु जो भगवान् ऋषभदेव, त्याचें हें अशा प्रकारचें परमपावन चरित्र मीं तुला कथन केलें. हें सर्व मनुष्यांच्या पातकांचा नाश करणारें आहे.

हें परम मंगलनिधान चरित्र जो कोणी भक्तिभावानें श्रवण करील किंवा दुसऱ्यास सांगेल त्या उभयतांची जगन्निवास परमेश्वरावर एकनिष्ठ भक्ति जडत राहील ॥ १६ ॥ अहाहा ! ह्या ईश्वरभक्ताचें माहात्म्य किती म्हणून वर्णन करावें ! ह्या आत्म्याला संसारांत पडल्यामुळें अनेक प्रकारच्या पापकर्मांनीं नाना प्रकारें ताप भोगावे लागतात, म्हणून सुज्ञ लोक त्या आत्म्याला घडोघडीं भक्तिरूप गंगेचें स्नान घालतात. त्यामुळें त्यांच्या मनाला पुष्कळ समाधान वाटतें. त्यामुळें आत्यंतिक परमार्थ जो मोक्ष, तो त्यांच्याजवळ चालून आला तरी ते त्याचा आदर करीत नाहींत. कारण एकदां परमेश्वराचे तद्रूप भक्त बनले म्हणजे सारेच पुरुषार्थ त्याच्या हातांत असतात. ॥१७॥ भगवान् तुम्हां पांडवांचा, व द्रेवांचा स्वामी, गुरु, देवता, प्रिय व कुलपति झाला इतकेंच नव्हे तर कित्येक वेळां सेवकहि झाला हें खरें; पण बाबा, तुमची गोष्ट स्वतंत्र आहे, सर्वांना ती लागू होणारी नव्हे; कारण इतर भक्तांसंबंधानें म्हणशील तर भगवान् त्यांना मुक्तिदेखील देईल; परंतु भक्तियोग कधींहि देणार नाहीं अशी भक्तियोगाची योग्यता आहे ॥ १८ ॥ भगवान् ऋषभदेवाला आत्मस्वरूपाचा नित्य आनंदानुभव असल्यामुळें त्याच्या भोगेच्छा सर्व निवृत्त झाल्या होत्या. देह हा पाहूं गेलें तर मिथ्या; पण लोक त्याच्याच सुखोपभोगाबद्दल मनांत मांडे खात बसतात. कल्याणाचा मार्ग शोधून काढण्याच्या कामांत त्यांची बुद्धि स्वस्थ झोंप घेत असते. हा प्रकार पाहून पोटांत दया उत्पन्न झाल्यामुळें ज्यानें लोकांना निर्भय अशा आत्मस्वरूपाचें यथार्थ ज्ञान करून दिलें, त्या महासमर्थ ऋषभदेवाला नमस्कार असो ॥ १९ ॥

यादवांचा

## सहावा अध्याय समाप्त

# अध्याय ७ वा

शुकाचार्य म्हणाले,—हे राजा, अशा त्या महान् भगवद्भक्त भरताला त्या ऋषभदेवानें स्वेच्छेनें संपूर्ण पृथ्वीचें राज्य करावयास अधिकार दिला असतां पित्याची आज्ञा पाळण्यास तत्पर असलेल्या भरतानें विश्वरूपाच्या पंचजनीनामक कन्येशीं विवाह केला ॥ १ ॥ भूतांचें आदिकारण जो अहंकार त्यापासून जशीं पंचमहाभूतें उत्पन्न होतात, त्याप्रमाणें भरतानें पंचजनीच्या ठिकाणीं पांच पुत्र उत्पन्न केले. ते सर्व गुणांनीं केवळ भरतासारखे होते ॥ २ ॥ सुमति, राष्ट्रभृत्, सुदर्शन, आवरण आणि धूम्रकेतु अशीं अनुक्रमानें त्यांचीं नांवें होतीं. पूर्वी या भरतखंडाला अजनाभ असें म्हणत होते; परंतु भरतराजा राज्य करूं लागल्यापासून लोक त्याला भरतखंड असें म्हणूं लागले ॥ ३ ॥ भरतराजा हा मोठा विद्वान् असून दयाळू अंतःकरणाचा होता. त्याची सारी प्रजा आपापल्या धर्माप्रमाणें वागे आणि त्यानें आपल्या वांडवडिलांप्रमाणें स्वधर्मानुसार वर्तन ठेवून सर्व जनांचें पालन केलें ॥ ४ ॥ त्यानें अग्निहोत्र, दर्शपूर्णमास चातुर्मास्य, पशु, सोम इत्यादि यज्ञकर्मांच्या साधकबाधक सर्वांगाचें परिपूर्ण ज्ञान संपादन करून चातुर्होत्र विधीच्या योगें वेळोवेळीं श्रद्धापूर्वक लहानमोठे यज्ञ करून परमेश्वराची आराधना केली ॥ ५ ॥ अशा प्रकारचे अनेक यज्ञ चालू आहेत. त्यांचीं प्रयाज, अनुयाज इत्यादि अंगें व विष्णुक्रमादि क्रिया जेथल्या तेथें होत आहेत, अशा वेळीं तो राजा त्या अनुष्ठानापासून किंवा यज्ञापासून जें धर्म या नांवानें अपूर्व फळ मिळवावयाचें, तें दुसरें तिसरें कांहीं नसून परब्रह्मस्वरूपी यज्ञपुरुष भगवान् वासुदेव हेंच होय, अशी भावना ठेवी आणि सर्व देवतांचें आवाहन करणाऱ्या मंत्रांचा अर्थ ठरविणारा असल्यामुळें त्या मंत्रांचा साक्षात्कर्ता तोच आणि सर्व देवतांत श्रेष्ठ देवताहि तोच असें तो मानी. यास्तव अध्वर्यूंनीं हातामध्यें हविर्भाग घेतले कीं, तो यजमान राजा, सूर्यादि देवता ह्या त्या भगवत्स्वरूपाचेच नेत्रादि अवयव होत, असें ध्यान करीत असे व त्यामुळें त्यानें आपल्या कौशल्यानेंच रागादि सर्व मल क्षीण करून टाकिले होते ॥६॥ अशा रीतीनें भरतानें शुद्ध कर्में आचरण केल्यामुळें त्याचें अंतःकरण शुद्ध झालें आणि हृदयरूपी कमळांत प्रगट झालेल्या परब्रह्मरूपी भगवान् वासुदेवाच्या ठिकाणीं त्याची भक्ति उत्तम प्रकारें जडली; इतकेंच नव्हे तर झपाट्यानें तिची वाढहि झाली. त्या वेळीं त्याच्या हृदयांत दृग्गोचर झालेल्या भगवद्रूपाचा आकार एखाद्या महापुरुषासारखा होता. त्याच्या अंगावर श्रीवत्सलाञ्छन, कौस्तुभ, वनमाला, शंख, चक्र, गदा इत्यादि चिन्हें दिसत होतीं. हाच भगवान् नारदादि भक्तांच्या हृदयांत चित्रासारखा निश्चल बसलेला असतो ॥ ७ ॥ ह्या प्रकारें भक्तियोगामध्यें हजारों वर्षें काल गेल्यानंतर भरताला

आपलें राज्यभोगाचें कारण संपलें, असें निश्चयानें वाटूं लागलें. म्हणून त्यानें वंशपरंपरेनें चालत आलेलें व आतांपर्यंत स्वतः उपभोगलेलें राज्य आपल्या पुत्रांना त्यांच्या त्यांच्या भागाप्रमाणें वांटून दिलें आणि तो स्वतः राजवैभवानें भरलेलें आपलें घरदार सोडून देऊन सर्वसंगपरित्यागपूर्वक पुलहाश्रमाकडे निघून गेला ॥ ८ ॥ भगवान् हा भक्तवत्सल प्रभु असल्यानें ह्या पुलहाश्रमांत राहणाऱ्या आपल्या भक्तांना अद्यापि तो त्याच्या प्रत्येक इच्छितरूपानें त्यांना दर्शन देत असतो ॥ ९ ॥ ह्या ठिकाणीं चक्रनदी ह्या नांवाची एक प्रचंड नदी वाहत असून ती आपल्या पवित्रोदकानें तो सर्व आश्रम पवित्र करून सोडिते. तिच्या उदरांत जे चक्रांकित पाषाण सापडतात त्यांना दोहों बाजूंनीं दोन नाभीसारखीं टेंगळें असतात. ॥ १० ॥ त्या पुलहाश्रमांतील रमणीय पुष्पवाटिकेमध्यें भरतराजा एकटाच राहत असे. अनेक प्रकारचीं पुष्पें, पत्रें, तुलसीदलें, उदक व कंदमूलफलांचे नाना प्रकारचे नैवद्य इत्यादि साहित्यानें तो भगवंताची तेथें नित्य आराधना करी, त्यामुळें त्याचें शरीर जसें शुद्ध झालें होतें, त्याप्रमाणें त्याचें मनहि शुद्ध झालें, त्यांच्या अंतरात्म्यांतील विषयेच्छा समूळ नष्ट होऊन त्याच्या मनाला परिपूर्ण शांति प्राप्त झाली आणि त्यामुळें भगवंताच्या आराधनेपासून त्याला केवळ ब्रह्मानंदाचें सुख वाटूं लागलें ॥ ११ ॥ याप्रमाणें त्यानें भगवंताची अखंड आराधना चालविल्यामुळें त्याचें भगवंतावरील प्रेम एकसारखें वाढत जाऊन त्याचें हृदय सात्त्विक भावानें प्रफुल्लित झालें व कोणतींहि कर्में करण्याची त्याला इच्छा राहिली नाहीं. तो परमानंदानें डुलूं लागे व अत्यानंदामुळें त्याच्या अंगावर दाट रोमांच उभे राहत. प्रेमाच्या उत्कंठेनें आनंदाश्रूंचे लोट चालून त्याचे नेत्र डबडबून येत आणि मग भगवत्स्वरूपाशिवाय त्याला कांहीं एक दिसत नसे. अशा रीतानें अत्यंत प्रिय अशा भगवंताच्या चरणकमलाचें ध्यान करतां करतां त्याचा भक्तियोग परिपूर्णतेला पोंचून त्या दयारूप खोल डोहांत परमानंदच भरून राहिला आणि आनंदामृतांतच त्याची बुद्धि बुडून गेली. त्यामुळें पुढें आपण हातानें पूजा काय व कशी करीत आहोंत ह्याचेंहि त्याला विस्मरण होई ॥ १२ ॥ याप्रमाणें भगवंताच्या आराधनेचें कडकडीत व्रत त्यानें धारण केलें होतें. मृगचर्माच्या परिधानानें त्यानें आपलें अंग आच्छादिलें होतें. तो त्रिकाळ स्नान करीत असल्यामुळें त्याच्या मस्तकावरील कुरळ केसांचा पिंगट जटाभार सदासर्वदा ओलाच असे आणि त्यामुळें तो फारच तेजस्वी दिसे. सूर्योदय होऊन सूर्यबिंब वर येऊं लागलें म्हणजे तो आपल्या अंतर्यामीं असलेल्या भगवान् हिरण्मय पुरुषाचें या सूर्याच्या ऋचेनें स्तवन करीत असे ॥ १३ ॥ रजोगुणात्मक प्रकृतीच्या पलीकडे असलेलें जें भगवान् सूर्यनारायणाचें

तेज, तेंच सर्व कर्मांचें फल देणारें आहे. कारण, त्या भगवंताच्या इच्छामात्रेंकरून हें सर्व ब्रह्मांड उत्पन्न झालेलें आहे. तोच भगवान् पुनः विश्वाच्या अंतर्यामांत प्रवेश करून नाना प्रकारच्या वासना धारण करणाऱ्या जीवांचें आपल्याच चिच्छक्तीनें पालन करतो आणि प्राण्यांमध्यें उपाधिरूपानें राहणाऱ्या बुद्धीला प्रेरणा करतो, त्या भगवंताला मी शरण येत आहें असें तो म्हणे ॥ १४ ॥

**सातवा अध्याय समाप्त**

# अध्याय ८ वा

शुकाचार्य म्हणतात,—एकदां तो भरतराजा प्रातर्विधि आटोपून आणि त्या महानदींत स्नान आदिकरून नित्यनैमित्तिक कर्में केल्यानंतर तीन मुहूर्तपर्यंत त्या नदीच्या कांठीं ॐकाराचा जप करीत बसला होता ॥ १ ॥ हे राजा, इतक्यांत त्या ठिकाणीं तहानेनें व्याकुळ झालेली हरिणी येऊन पोंचली ॥ २ ॥ ती अधाशासारखें भराभरा पाणी पीत आहे तोंच दुरून एका सिंहानें केलेल्या गर्जनेचा ध्वनि तिच्या कानांवर येऊं लागला. सिंहाची गर्जना किती भयंकर असते हें सांगणें नकोच. तिच्या योगानें प्रत्येक प्राणिमात्र भयानें कासावीस होतो ॥ ३ ॥ आधींच हरिणाची जात स्वभावानें भित्री, त्यांतून ती एकटी, आणखी सिंहाची गर्जना अगदीं जवळ येऊन ठेपली; असें ऐकूं आलेल्या शब्दावरून वाटे. मग काय विचारावें ? तिनें आपले डोळे कावरेबावरे केले. सिंहाची धडकी पोटांत भरल्यामुळें तिचें अंतःकरण व्याकुळ झालें. तिची दृष्टि क्षणमात्रहि स्थिर राहीना. पुरती तहान भागली नसतांसुद्धां तिनें नदीपलीकडे भीतीनें उडी मारिली ॥ ४ ॥ ती हरिणी गर्भिणी होती. त्यामुळें भीतीच्या धक्क्यानें तो गर्भ गर्भाशयांतून सुटला आणि तिनें उडी मारतांच तो उदरांतून बाहेर येऊन नदीच्या प्रवाहांत पडला ॥ ५ ॥ गर्भपात, उडी आणि सिंहाची भीति ह्या तिन्हीही कारणामुळें त्या हरिणीला मनस्वी यातना होऊं लागल्या. तिची आणि तिच्या कळपाची चुकामूक झाली आणि अखेर ती हरिणी एका दरींत पडून मरण पावली ॥ ६ ॥ इकडे तें तिचें नुकतेंच उदरांतून बाहेर पडलेलें बालक नदीच्या प्रवाहांतून वाहत चाललेलें भरतराजाच्या दृष्टीस पडलें. तेव्हां बंधूची दीनस्थिति पाहून जशी बंधूला दया यावी, त्याप्रमाणें त्या अनाथ पाडसाला पाहून त्या राजर्षीला दया आली. त्याची आई मेली हें त्या राजानें पूर्वींच पाहिलें होतें; म्हणून त्यानें त्या हरिणबालकाला उचलून आपल्या आश्रमांत आणिलें ॥ ७ ॥ त्या हरिणबालकाबद्दल ‘ हें आपलें आहे ’ असा त्या राजाला मोठा अभिमान वाटूं लागला. तो त्याला प्रतिदिवशीं चारा घाली, पाणी पाजी, कुरवाळी, गोंजारी. असे त्याचे लाड दिवसेंदिवस वाढत चालले, त्यामुळें भरताचीं स्नान, पूजा, जप, तप इत्यादि नित्यकर्में एकामागून एक कमी होत जाऊन कितीएक दिवसांनीं सर्वथैव बंद पडलीं. कारण त्याचा सारा वेळ त्या हरिणबालकाच्या जोपासनेंत जाऊं लागल्यामुळें इतर कामाला त्याला वेळच मिळत नसे ॥ ८ ॥ त्याला वाटे हें हरणाचें पोर किती बरें गरीब ! कालचक्राच्या सपाट्यांत सांपडल्यामुळें ह्याला आपल्या आईबापांचा, जातगोताचा व इष्टमित्रांचा वियोग झाला म्हणून तो बिचारा माझ्या आश्रयाला आला. आतां तर आईबाप, भाऊबंद, जातगोत, ज्ञातिबांधव, इष्ट, आप्त सारें काय तें मीच असें समजतो. माझ्याशिवाय दुसऱ्या कोणाचीच त्याला ओळख नाहीं. त्याचा सारा जीवभाव काय तो मी. इतका तो ज्या अर्थीं मला शरण आला

आहे, त्या अर्थी मी आतां, 'हा माझ्या जातीचा न गोताचा, ह्याच्यामुळें माझ्या नित्य-कर्मात मात्र अंतर पडतें, माझ्या स्वार्थावर पाणी पडतें,' हा विचार मनांत न आणितां ह्याचें लालनपालन व कोडकौतुकच मला केलें पाहिजे. शरण आलेल्या प्राण्याची उपेक्षा केली असतां केवढें पातक होतें हें मी पूर्णपणें जाणतों. ह्याकरितां मला आतां ह्याच्या संगोपनामध्यें लेशमात्र हयगय करतां कामा नये ॥ ९ ॥ मोठमोठे सत्त्वशील व शांत स्वभावाचे सत्पुरुष असतात, ते अनाथाचें संरक्षण करणें हेंच आपलें ब्रीद समजतात व अशा कार्यासाठीं आपलीं स्वतःचीं कितीही महत्त्वाचीं कामें असलीं तरी तीं क्षणभर एका बाजूस ठेवितात ॥ १० ॥ अशा रीतीनें भरताचें त्या हरिणबालकावर अत्यंत प्रेम जडलें. तो बसला तरी, निजला तरी, फिरावयास गेला तरी, उभा असला तरी, किंवा खातपीत असला तरीसुद्धां त्याचें सारें लक्ष त्या हरिणीच्या पाडसाकडे लागलेलें असे ॥ ११ ॥ दर्भसमिधा, कंदमुळें, फळेंपुष्पें किंवा उदक वगैरे आणण्याचा त्याला वारंवार प्रसंग येई; पण आश्रमाच्या बाहेर पाऊल टाकावयाचें म्हटलें कीं, त्याच्या मनांत लगेच शंका उत्पन्न होई कीं, लांडगे, कोल्हे ह्यांसारखे कोणी हिंस्र पशु येऊन त्याच्या पाठीस तर लागणार नाहींत ना ? म्हणून तो जिकडे जिकडे फिरावयास जाई, तिकडे तिकडे त्या पाडसाला आपल्याबरोबरच नेत असे ॥ १२ ॥ तें हरिणीचें पोर त्याच्या पाठीमागून बाहेर निघालें म्हणजे वाटेंत अल्लडपणानें कोठें झाडपान दृष्टीस पडलें कीं, तेथेंच उभें राही. कोठें एखादें पानच चघळीत बसे. असा ठिकठिकाणीं त्याचा खोळंबा करी; पण त्याची ती लीला पाहून भरताच्या हृदयाला अधिकाधिकच प्रेमपाझर फुटत असे. तो त्याला उचलून आपल्या स्कंधावर घेई, कधीं त्याला मांडीवर घेऊन तो कुरवाळी व कधीं लाडानें त्याच्या अंगावर हात फिरवीत बसे आणि त्यांतच त्याला परमानंद वाटे ॥ १३ ॥ भरतराजा पूजा करीत बसला असतां एखादे वेळीं मध्येंच त्या हरिणबालकाची त्याला आठवण झाली तर तो लगेच उठून बाहेर येई व त्याच्याकडे कौतुकानें पाहून, 'बाळा, तुझें कल्याण होवो,' असा त्याला आशीर्वाद देई ॥ १४ ॥ तें पाडस जरा दृष्टीआड झालें कीं, एखाद्या कवडी-चुंबकाची ठेव नाहींशी व्हावी त्याप्रमाणें त्याच्या जिवास तळमळ लागे. त्या हरिणबालकाचा विरह झाला कीं, त्याचें अंतःकरण विव्हल आणि संतप्त होई. फार काय सांगावें ? त्याला घटका दोन घटका बाहेरून यावयास उशीर झाला कीं, तो लगेच मूर्च्छा येऊन धरणीवर पडे आणि एखादें पोटचें पोरच नष्ट व्हावें त्याप्रमाणें विलाप करूं लागे व म्हणे ॥ १५ ॥ अरेरे, किती मी नीच ! माझी बुद्धि दुसऱ्याला फसविण्यांत व क्रूरपणांतच मोठी पटाईतच खरी. माझ्यासारख्या चांडाळावर कीं हो त्या पाडसानें विश्वास ठेवला ! आई मरून बिचारें पोरकें झालेलें खरोखरच निर्मळ अंतःकरणाचें. साधूला सारे लोक आपल्यासारखेच साधु आहेत असें वाटतें. त्याप्रमाणेंच तें पाडसहि आपल्याप्रमाणेंच सर्वांचीं मनें शुद्ध आहेत असें समजून क्रूरपणादि दुर्गुण मनांत न आणतां पुनश्च तें मजकडे येईल काय ? ॥ १६ ॥ ईश्वरकृपेनें तें खुशाल असून ह्या आश्रमाच्या सभोंवतालच्या उपवनांतच चरत असलेलें माझ्या दृष्टीस पडेल काय ? ॥ १७ ॥

लांडग्याकोल्ह्यासारखीं हिंस्र प्राण्यांची झुंड किंवा वाघासारखा कोणी एकटा फिरणारा पशु येऊन तो तर त्याला मारून खात नसेल ना ? ॥ १८ ॥ जगाच्या कल्याणासाठीं उदय पावणारा वेदत्रयरूपी भगवान् सूर्यनारायण अस्तास चालला तरी हरिणीनें मजपाशीं ठेवलेला ठेवा अद्याप मजकडे कां बरें येत नाहीं ? ॥१९॥ माझ्याकडून जर कोणतेंच कांहीं पुण्याचरण घडलें नाहीं, तर तो तरी मला कशाचा सांपडणार ? पण काय हो ! तो हरिणराजकुमार अद्यापि मजजवळ येऊन मला आनंद देईल काय ? त्याचें तें हरिण-बालकाच्या जातीला अनुरूप असें नाना प्रकारचें सुंदर व दर्शनीय क्रीडाकौतुक दृष्टीस पडलें कीं, त्याचें आतेष्ट जो मी, त्या माझा सारा खेद दूर होईल काय ? ॥ २० ॥ त्याच्याशीं खेळतांना मी उगाच समाधी लावण्याचें ढोंग करतों, तेव्हां तोहि लाडालाडानें रुसल्याचा आव आणून भीतभीत माझ्याजवळ येतो आणि जलकणाप्रमाणें मृदु अशा आपल्या शिंगांच्या अणकुचांनीं मला ढुशा देतो ! ॥ २१ ॥ मी दर्भावर होमद्रव्यें मांडून ठेवलीं म्हणजे तें माझें ' बछडे ' आपल्या लुडबुड्या स्वभावाप्रमाणें ते दर्भ आपल्या दातांनीं कुरतडी, तेव्हां मी त्यास थोडासा रागाचा आविर्भाव आणून दटावी त्या वेळीं तें 'बछडें' एखाद्या ऋषिकुमाराप्रमाणें तो आपला चाळा बंद करून आपले पाय आखडून आज्ञाधारक झाल्याप्रमाणें निमूट बसत असे ! असे त्याचे किती गुण म्हणून आठवावेत ॥२२॥ " अहो, ही पृथ्वीसुद्धां मोठी तपोनिष्ठ दिसते. हिनें अशी कोणती बरें तपश्चर्या केली असावी कीं, जिच्या योगानें हिच्या पाठीवर त्या सुशील हरिणीपुत्राच्या चिमुकल्या, गोंडस, सुकुमार व सुखकर अशा खुरांच्या पावलांच्या ओळींच्या ओळी उमटल्या आहेत ? हीं चिन्हें जिकडेतिकडे उमटलेलीं असल्यामुळें ह्या पृथ्वीला केवढी बरें शोभा आली आहे ! ह्या मुद्रांनीं केवढालीं दोन कार्यें केलीं आहेत पाहा ! एक तर द्रव्य नाहींसे झालेल्या मनुष्याला द्रव्याचा नवा मार्ग दाखवावा त्याप्रमाणें त्या हरिणबालकाचा मार्ग दाखवीत आहेत आणि दुसरें, स्वर्गाची किंवा मोक्षाची इच्छा करणाऱ्या ब्राह्मणांना देवांच्या प्रीत्यर्थ यज्ञ करण्यास पवित्र स्थळ कोणतें तें दर्शवीत आहेत ! * ॥ २३ ॥ ( मग चंद्र-बिंबावरील हरिणाकडे पाहून राजा म्हणाला ) मला तर असें वाटतें कीं, चंद्रबिंबावर दिसत आहे हा माझाच हरिण असावा. सिंहाच्या धास्तीनें त्याची माता मृत झाली व तो माझ्याहि आश्रमांतून चुकला अशी ह्याची दीन दशा पाहून त्या तारकाधिपाच्या पोटांत भडभडून आल्यामुळें तो दीनवत्सल चंद्र त्याला पोटाशीं धरून बसला असावा काय ? ॥ २४ ॥ इतक्यांतच चंद्राचे शीतळ किरण अंगास लागल्यामुळें सुख वाटून राजा म्हणाला ,—मी त्या हरिणबाळकाला आपल्या पुत्राप्रमाणें समजतों आणि त्याला शोधण्यासाठीं मी सारखा फिरत आहें. त्याच्या वियोगानें मला ज्वर भरला आहे आणि त्या ज्वराच्या वणव्या-

---

* हरिण जेथें फिरतात तें स्थळ यज्ञ करण्यास योग्य, असें शास्त्रांत सांगितलें आहे. ' कृष्णसारस्तु चरति मृगो यत्र स्वभावतः । स ज्ञेयो यज्ञियो देशो म्लेच्छदेशस्ततः परः । '
(मनुस्मृति, अ. २. श्लो. २३)

सारख्या तीक्ष्ण दावाग्नीनें उष्णतेमुळें माझें भूमीवरील कमलिनीसारखें कोमळ असें हें हृदय करपून चाललें आहे. चंद्र हा ज्वरावर मंत्र घालणारा मांत्रिक असावा असें वाटतें. कारण, दयाळू मंत्री ज्याप्रमाणें मंत्रोदकाची चूळ भरून ती ज्वरिताच्या अंगावर टाकून त्याचा ताप उतरवतो, त्याप्रमाणें ह्या चंद्रालाहि माझी ही स्थिति पाहून कींव आली असावी; म्हणूनच तो आपल्या मुखांतून वरचेवर निघणाऱ्या मंत्रोदकासारख्या शीतल व शांत अशा अमृतमय किरणांनीं मला सुख देत आहे ॥ २५ ॥ अशा प्रकारें नाना प्रकारच्या कल्पनातरंगांनीं त्या भरताचें हृदय व्याकूळ होत असे. त्या हरिणबालकाच्या रूपानें हें याचें प्रारब्धकर्मच पुढें ओढवलें असें म्हटलें पाहिजे. कारण त्यानें त्या योगाभ्यासी तपस्वी पुरुषाला त्याच्या योगापासून व तपापासून भ्रष्ट केलें इतकेंच नाहीं, तर ज्यांचा मायाजाळ परम कठीण असे पोटचे प्रत्यक्ष पुत्र मोक्षमार्गास विघातक आहेत असें समजून ज्यानें त्यांचा पूर्वींच त्याग केला त्याची भलत्याच जातीच्या म्हणजे एका हरिणीच्या पिल्लावर इतकी जिवापेक्षां अधिक ममता कशी जडावी? तात्पर्य, त्या राजर्षीच्या योगाभ्यासावर ह्याच्यायोगें सारें पाणी पडलें आणि त्या हरिणीच्या पाडसाचें लालनपालन व कोडकौतुक करतां करतां त्याला आत्मस्वरूपाचा अगदींच विसर पडला. इतक्यांत एखादा सर्प जसा उंदराच्या बिळापाशीं येऊन पोंचावा त्याप्रमाणें त्याचा अंतकाल समीप येऊन ठेपला ॥ २६ ॥ भरताच्या मरणसमयीं सुद्धां हरिणबालक जवळ असून प्रेमामुळें तो एखाद्या पोटच्या पोराप्रमाणें चिंतातुर मुद्रेनें त्याच्याकडे पाहात होता. राजाची दृष्टि त्याच्याकडे वेधून राहिल्यामुळें त्याला हरिणाचाच निदिध्यास लागला होता. त्यामुळें तसाच तो त्या हरिणीसह इहलोकाचा त्याग करून गेला. त्याचें शरीर मृत झालें, परंतु पूर्वस्मृति नष्ट झाली नाहीं. मरणसमयीं मनांत जी वासना राहते तोच देह पुढें प्राप्त होतो, ह्या सार्वत्रिक नियमाप्रमाणें भरताला पुढें हरिणीचा जन्म प्राप्त झाला ॥ २७ ॥ त्यानें पूर्वजन्मीं परमेश्वराची उत्तम आराधना केलेली होती. त्यामुळें त्याला त्या हरिणजन्मांत सुद्धां आपण पशुयोनींत कां येऊन पडलों ह्याचें स्मरण होत होतें. तो पश्चात्तापपूर्वक म्हणे कीं अहो, मला किती यातना सोसाव्या लागत आहेत ह्या! मी विवेकी पुरुषाच्या मार्गापासून भ्रष्ट झालों कीं हो! माझी योग्यता किती तरी मोठी होती! मीं सर्वसंगपरित्याग केला, एकांतासाठीं पवित्र अरण्याचा आश्रय धरला, आत्मविवेक संपादन केला आणि सर्वांचा आत्मा जो षडगुणैश्वर्यसंपन्न वासुदेव त्याच्या ठिकाणीं एकाग्र मन ठेविलें. परमेश्वराच्या कथा श्रवण करणें, त्याचें मनन व कीर्तन करणें, परमेश्वराचें आराधन व भजनपूजन करणें ह्याशिवाय एक क्षणहि मी फुकट घालविला नाहीं. असें असून माझें मूर्खाचें मन पुनः एका हरिणीच्या पोरावर गळून पडलें, ह्याला म्हणावें तरी काय? ॥ २८ ॥ २९ ॥ त्याच्या अंतःकरणांत उत्पन्न झालेलें हें वैराग्य त्यानें तें बाहेर दाखविलें नाहीं. पण आपली माता हरिणी तिला सोडून तो कालंजर पर्वतावरून पुन्हा पुलस्त्यपुलह ऋषींच्या आश्रमांत आला. तें भगवंताचें वसतिक्षेत्र असून शांत स्वभावाच्या मुनिवर्यांना तें अत्यंत प्रिय वाटतें. तेथें 'शाल' नांवाच्या वृक्षांचें

मोठें बन आहे ॥ २० ॥ तेथें आल्यावर तो मृग मृत्यूचीच वाट पाहत राहिला. तेथें त्याला कोणाशींहि परिचय करण्याचा कंटाळा वाटूं लागला. तो एकटाच भटकत फिरत असे व वाळलेलीं पानें, गवत व वेली खाऊन आपला निर्वाह करी. हरिणाचा जन्म येण्याचें कारण जें कर्म, तें केव्हां संपतें ह्याविषयीं त्याला अगदीं उतावीळ झाली होती. तो सारखे आयुष्याचे दिवस मोजीत बसला होता व शेवटीं त्यानें तीर्थोदकांत गळ्यापर्यंत बुडून बसून त्या मृगशरिराचा त्याग केला ! ॥ २१ ॥

**आठवा अध्याय समाप्त**

---

# अध्याय ९ वा

शुकाचार्य म्हणाले,—हे राजा, त्याच वेळीं ह्या भरतवर्षांत अंगिरागोत्रामध्यें श्रेष्ठ असा एक ब्राह्मण राहत होता. त्याच्या अंगीं शांति, इंद्रियनिग्रह, तपश्चर्या, वेदाध्ययन, औदार्य, संतोष, सहनशीलता, विनय, कर्मठपणा, निर्मत्सरता, आत्मानात्मविचार, धर्म व संपत्ती ह्यांपासून उत्पन्न होणारे आनंद इत्यादि गुण वसत असत. त्याला दोन भार्या होत्या. त्यांतील पहिलीपासून त्याला नऊ पुत्र झाले. ते नऊहि पित्याप्रमाणेंच विद्वान्, सदाचारी, सुशील, सुस्वरूप व उदार होते. कनिष्ठ पत्नीला एक मुलगा व एक मुलगी अशीं दोन जुळीं अपत्यें झालीं ॥ १ ॥ ह्या दोहोंपैकीं जो पुरुष होता, तो महाभगवद्भक्त राजर्षि भरताचा अवतार होय असें म्हणतात. मृगाचें शरीर सोडल्यानंतर त्यानें हें ब्राह्मणाचें स्वरूप धारण केलें. हा जन्म त्याचा शेवटचाच होता ॥ २ ॥ ह्या जन्मामध्यें सुद्धां तो अगदीं विटल्यासारखा, आप्तेष्टांच्या समागमापासून फार दूर असे. तो रात्रंदिवस परमेश्वराच्या चरणयुगुलांचेंच ध्यान करीत असे. कारण, ज्यांचें श्रवण, स्मरण व गुणवर्णन केलें तर प्राण्यांचें बंधन तुटतें, त्या भगवंताच्या अनुग्रहामुळें त्याला पूर्वजन्माची परंपरा आठवत होती. 'कोणावरहि प्रेम ठेवलें तर आपला घात होईल' ही भीति पोटांत असल्यामुळें तो लोकांना, आपण उन्मत्त, वेडा, आंधळा व बहिरा आहों, असेंच भासवीत असे ॥ ३ ॥ तरी पुत्रवात्सल्यामुळें त्या ब्राह्मणाचें मन त्याच्यावर लागून राहिलेलें होतें. त्यानें इतर पुत्रांप्रमाणेंच ह्याचेहि विद्यासमाप्तीपर्यंतचे सर्व संस्कार यथाविधि केले. त्याच्या मनांत नव्हतें तरी त्याच्या पित्यानें त्याला शौच, आचमन इत्यादि कर्मांचे नियम कसेबसे तरी शिकविले. कारण, 'मुलाला पित्यापासून कांहीं तरी शिक्षण मिळावें' असें त्याला वाटत होतें ॥ ४ ॥ पण मुलास वाटे कीं, पित्यानें हा आपल्या शिक्षणाचा आग्रह सोडावा. यासाठीं तो त्याच्यापुढें नाना प्रकारचे वेडेवेडे चार करी. पित्याच्या मनांत त्याला वेद पढवावा असें फार होतें; म्हणून त्यानें व्याहृति, प्रणव आणि शिर ह्यांसह त्रिपदा गायत्रीमंत्र नीट पढविण्यासाठीं वसंतऋतु व ग्रीष्मऋतु हे चार महिने खटपट केली व तेवढा मंत्र कसा तरी वेडावांकडा अडखळत त्याच्या तोंडांतून एकदाचा बाहेर काढिला ॥ ५ ॥ त्या ब्राह्मणाला तो आपला पुत्र अगदीं जीव कीं, प्राण वाटत असे. त्याच्या मनांत 'ह्यानें सुशिक्षित व्हावें' असा दुराग्रह भरल्यामुळें त्यानें त्याचा उपकुर्वाण ब्रह्मचाऱ्यास आवश्यक अशीं पवित्रता अध्ययन, व्रतें, नियम, गुरूची व अग्नीची सेवा इत्यादि कर्में शिकविण्याचा प्रयत्न केला; पण त्याची इच्छा पूर्ण झाली नाहीं. उलट गृहकृत्यांत गुंतून पडल्यामुळें त्याला स्वतःच्या कर्तव्याचा मात्र विसर पडला. शेवटीं आपलें कर्तव्य न विसरणाऱ्या त्या काळानें ब्राह्मणाला उचलून नेलें ॥ ६ ॥ त्या ब्राह्मणाची कनिष्ठ भार्या महासाध्वी होती. ती

आपल्या उदरीं जन्म पावलेलीं दोन्ही मुलें सवतीच्या स्वाधीन करून पतिलोकप्राप्तीसाठीं सती गेली ॥ ७ ॥ भरताचे सारे भाऊ वेदांतल्या कर्ममार्गांत निष्णात होते; पण ब्रह्मविद्येची मात्र त्यांना ओळख नव्हती. त्यामुळें भरताची खरी योग्यता न कळतां हा एक मठ्ठ डोक्याचा माणूस आहे असें ते समजत; तेव्हां भावाच्या नात्यानें त्याला शिक्षण देणें वगैरे कर्तव्यापासून ते परावृत्तच झाले ॥ ८ ॥ ज्यांना केवळ दोन पायांचे पशु म्हटलें तरी चालेल, असे टवाळ लोक त्याला 'ए म्हसोबा ! अहो दगडोपंत ! ए बहिरटा !' अशा हाका मारीत व तो त्यांना अनुरूप अशीं उत्तरें देत असे. कोणी त्याच्याकडून कांहीं काम करून घेऊं लागला तर तो त्याच्या इच्छेप्रमाणें तें करीत असे. कधीं कधीं लोक त्याला वेठीला जुंपीत; कधीं कधीं तो मजुरी करीत असे. तो कधीं भिक्षा मागे तर एखादे वेळीं त्याला आपोआप कांहीं मिळत असे. अशा रीतीनें जें थोडेंबहुत शिळेंपाकें, जाडेंभरडें मिळेल तें अन्न आनंदानें खात असे. इंद्रियसुख हें त्याचें ध्येयच नव्हतें. कारण ज्याला कधींच कोणी उत्पन्न केलें नाहीं, असा स्वयंभू, शुद्ध, अनुभवरूपी व आनंदमय आत्माच मी आहें, हें आत्मज्ञान भरताला पूर्वींच प्राप्त झालेलें होतें व त्यामुळें मानापमान, जयापजय इत्यादि द्वंद्वांपासून होणारा सुखदुःखविषयक देहाभिमान तो कधींच ठेवीत नसे ॥ ९ ॥ थंडी असो, ऊन्ह असो, वारा असो कीं पाऊस असो; भरत आपला सदानकदा बैलासारखा उघडा ! त्याचें शरीर पुष्ट व हातपाय भक्कम होते. भुईवरच लोळावयाचें, अंग चोळावयाचें नाहीं, स्नान करावयाचें नाहीं अशा रीतीमुळें त्याच्या अंगावर धुळीचीं पुटेंच्या पुटें बसलेलीं असत. म्हणून जसा एखादा हिरा केरांत लोळत पडला तर त्याचें तेज फांकत नाहीं, त्याप्रमाणें भरताच्या अंगीं ब्रह्मतेज होतें तरी तें कधीं स्पष्ट दिसत नसे. त्याच्या कमरेला एक मळकटसें वस्त्र गुंडाळलेलें असे व जानव्यावर खंडीभर मळ सांचलेला असे. अर्थात् ज्यांना त्याचें खरें स्वरूप कळत नसे ते त्याला नुसता ब्राह्मणाच्या जन्मास आलेला आडनांवाचा ब्राह्मण असें म्हणून त्याची निर्भर्त्सना करीत; परंतु तो त्यांच्याकडे लक्ष न देतां तसाच फिरत असे ॥ १० ॥ आपण आपलें मोलमजुरी करूनच पोटास मिळवावें, असें जर एखादे वेळीं त्याच्या मनांत आलें, तर त्याचे प्रत्यक्ष भाऊ त्याला जेवावयास घालावयाचें कबूल करून त्यास शेतांत काम करावयास लावीत आणि तें तो करीत असे. अशी माती टाकली तर जमीन सारखी होईल किंवा ह्या ठिकाणची माती काढली तर तेथें खळगा पडेल, येथें चिखल टाकला तर टेंकाड होईल, ह्याची त्याला मुळींच जाणीव नसे आणि कण्या, कोंडा, किडके उडीद, भांड्यांत राहिलेल्या जळक्या खरपुड्या इत्यादि मिळेल तें अन्न अमृताप्रमाणें समजून तो खात असे ॥ ११ ॥ हे राजा, हें तर असो, आतां दुसरी कथा ऐक. एकदां एक शूद्रांचा राजा होता. तो आपल्याला संतति व्हावी म्हणून भद्रकालीदेवीला एका मनुष्याचा पशूप्रमाणें बलि अर्पण करणार होता ॥ १२ ॥ त्यानें त्यासाठीं एक मनुष्य बळी म्हणून धरून आणिला; परंतु त्याचें दैव बलवत्तर म्हणून तो तेथून निसटून गेला. तेव्हां शूद्रराजाचे सेवक त्याला धरण्याकरितां त्याच्या मागून धावत निघाले; पण ती रात्रीची

वेळ असून जिकडेतिकडे अंधार पडला होता म्हणून त्यांना तो मनुष्य कांहीं सांपडला नाहीं. अशा स्थितींत एकाएकीं हा अंगिराऋषीचा महात्मा पुत्र भरत त्यांच्या दृष्टीस पडला. त्या वेळीं हरणें, डुकरें वगैरे पशूंनीं शेताची नासाडी करूं नये म्हणून तो शेताची राखण करीत वीरासन घालून बसला होता ॥ १३ ॥ पुरुषांमध्यें उत्तम लक्षणें म्हणून जीं जीं सांगितलेलीं आहेत, तीं तीं सर्व त्याच्या ठिकाणीं दिसत होतीं. तीं पाहून आतां आपल्या धन्याचें कार्य सिद्धीस गेलेंच, असें म्हणून त्या शूद्रराजाच्या सेवकांनीं त्याला दोरीनें बांधून चंडिकेच्या देवालयांत नेलें व आनंदित मुद्रेनें त्याला तिच्यापुढें उभें केलें. ॥ १४ ॥ नंतर त्या चोरांनीं त्याला आपल्या विधीप्रमाणें मंगलस्नान घातलें. त्याच्या अंगावर नवीन वस्त्रें घातलीं; नाना प्रकारचे अलंकार घातले; गंधाक्षता, फुलें वगैरे वाहून त्याची पूजा केली; त्याला चंदनाची उटी लावली व कपाळाला शेंदूर फासला. सुग्रास अन्नाचें त्याला भोजन घातलें; धूप, दीप, पत्रें, पुष्पें, दूर्वा, लाह्या, फळें, नैवेद्य वगैरे साहित्याची सिद्धता करून गाणीं, पोवाडे, ढोल, टिमक्या ह्यांचा एकच दणदणाट चालू झाला आणि मग त्याला आणून त्यांनीं देवीच्या समोर उभें केलें ॥ १५ ॥ नंतर त्या चोरांच्या राजानें पुरुषरूप पशूच्या रक्तरूप मद्यानें भद्रकाली-देवीची पूजा करण्यासाठीं देवीमंत्रानें अभिमंत्रित केलेली अत्यंत भयंकर अशी ती तलवार हातांत घेतली ॥ १६ ॥ त्या शूद्र लोकांचे स्वभाव रजोगुणानें व तमोगुणानें भरलेले होते. द्रव्यानें व रजोगुणानें मदोन्मत्त झाल्यामुळें त्यांचीं मनें मर्यादा सोडून फार बहकलीं होतीं. ब्राह्मणाचें कुल तें भगवंताच्या अंशानें युक्त असतें; परंतु ते चोर लोक त्याच ब्रह्मकुलाला तुच्छ मानून वाटेल त्या दुराचारानें वागत असत. हिंसा म्हणजे त्यांचा केवळ खेळ. आपत्तिकाळीं हिंसा करण्यास शास्त्रानें सुद्धां अनुज्ञा दिलेली आहे; परंतु ब्राह्मणाचा वध करण्याविषयीं शास्त्रानें कोठेंच संमति दिलेली नाहीं. त्यांतून हा ब्राह्मण म्हणजे सामान्य नव्हे, तर प्रत्यक्ष ब्रह्मस्वरूप झालेला होता. साक्षात् ब्रह्मर्षीचा तो पुत्र असून वैर सोडून सर्वांशीं मैत्री ठेवणारा होता. अशा पुरुषाचा वध करण्यास ते चोर उद्युक्त झाले असें पाहून, त्या अतिदुःसह ब्रह्मतेजाच्या योगानें भद्रकाली-देवीच्या अंगाची नुसती आग झाली ! आणि ती मूर्ति सोडून एकदम बाहेर निघाली ! ॥ १७ ॥ त्या शूद्र चोरांनीं केलेल्या ब्राह्मणाच्या अपराधाचा दुःसहपणा व शरिराचा दाह ह्या दोहोंच्या योगानें अंगांत संचार झाल्यामुळें देवीच्या भुवया अतिशय चढून गेल्या आणि तिच्या वक्र दाढा आणि लाल डोळे सारखे थरथरूं लागले. तिची मुद्रा फारच भयंकर होऊन आतां ही सारें ब्रह्मांड गिळून टाकते कीं काय ? असा भास झाला. ती एकदां मोठ्यानें खदखदा हसली, आणि तेथून ताडकन उडी मारून त्याच तलवारीनें तिनें त्या पापी चंडळाचीं मस्तकें तोडलीं आणि कंठनालांतून निघणारें उष्ण उष्ण रक्तासव आपल्या सेवक-गणांसह प्राशन केलें ! त्या अतिशय रक्तप्राशनानें ती देवी धुंद होऊन आपल्या पार्षदगणांसह गात व नाचत सुटली ! आणि त्या चोरांचीं मस्तकें हेच चेंडू समजून ती त्यांनीं खेळूं लागली ॥ १८ ॥ हे राजा, सत्पुरुषाचा घात करण्याविषयीं जो प्रवृत्त होतो त्याचें फळ त्याला

स्वतःलाच सर्वतोपरी भोगावें लागतें ॥ १९ ॥ हे परीक्षित्‌राजा, जे महाभागवत व परमहंस वृत्तीचे पुरुष असतात ते स्वतःचें मस्तक तुटण्याचा प्रसंग आला तरी डगमगत नाहींत, ह्याबद्दल फारसें आश्चर्य वाटावयास नको.कारण, ज्याला कोणाचेंहि भय नाहीं अशा त्या भगवंताच्या चरणकमलाचा आश्रय धरून ते असल्यामुळें भगवान् हाच साक्षात् दक्षपणानें स्वतःच्या कालचक्ररूपी उत्तम आयुष्याच्या योगेंकरून भद्रकालीसारख्या निरनिराळ्या देवतांकडून त्यांचें रक्षण करीत असतो. सत्पुरुषाच्या देहादिकांवरील आत्मभावरूपी बळकट हृदयग्रंथी अगदीं सुटलेला असतो, त्यामुळें ते सदासर्वदा सर्व जीवांचे मित्र व आत्मेच होऊन राहतात. त्यांचें वैर असें कोणाशींच नसतें ॥ २० ॥

**नववा अध्याय समाप्त**

---

# अध्याय १० वा

शुकाचार्य म्हणाले,--हे राजा, त्या भरताच्या संबंधानें आणखीहि एक चमत्कारिक गोष्ट घडून आली. सांगतों, श्रवण कर. त्या वेळीं सिंधुसौवीर देशावर रहूगण ह्या नांवाचा एक राजा राज्य करीत होता. एकदा त्याची स्वारी इक्षुमतीनदीच्या तीरावरून चालली असतां तेथें त्याची पालखी वाहावयाला भोईलोकांची गरज लागली. तेव्हां भोयांची भरती करीत असतां दैवानें त्यास ह्या श्रेष्ठ ब्राह्मणाची गांठ घालून दिली. हा मनुष्य चांगला गलेलठ्ठ व जवान असून अंगापिंडानें बळकट आणि बैलासारखा किंवा गाढवासारखा ओझें वाहण्याला योग्य आहे असें म्हणून त्यानें पूर्वी वेठीला धरलेल्या माणसांबरोबर ह्यालाहि पुढें घालून धक्काबुक्की करीत नेलें! तें काम वास्तविक पाहिलें तर ह्याला अगदीं अयोग्य होतें; परंतु तो तेजस्वी महात्मा पालखी उचलण्याचें काम करूं लागला ॥ १ ॥ ते भोई ती पालखी घेऊन चालूं लागले असतां; आपल्या पायांखालीं कीडमुंगीसारखे लहान जीवसुद्धां चिरडून जाऊं नयेत, म्हणून भरत प्रत्येक पाऊल टाकतांना आपल्या सभोंवार चारपांच हात पाहून तें टाकीत असे. त्यामुळें इतर भोयांची व ह्याची चाल जमेना व पालखीला हिसके बसूं लागले. हें पाहून राजा रहूगण त्या भोयांना म्हणाला,—अरे भोयांनो, नीट चाला. अशी पालखीची हिसकाहिसकी काय चालविली आहे? ॥ २ ॥ राजाचें तें क्रोधयुक्त भाषण ऐकतांच सर्व भोयांची पांचावर धारण बसली. त्यांस वाटलें कीं, आतां यापुढें आम्ही जर नीट चाललों नाहीं, तर मागाहून चौथ्या उपायाचा प्रयोग आपल्यावर होईल. म्हणून त्यांनीं राजाला नम्रपणें विनंती केली ॥ ३ ॥ ते म्हणाले,-हे महाराजा, आम्ही कांहीं आडदांडपणानें वागत नाहीं. आपल्या नियमाप्रमाणें वाटेमध्यें पालखी वाहत आहों; पण हा नुकताच आणलेला भोई भराभर पाय उचलीत नाहीं. खरोखर आम्हांला याच्याबरोबर पालखी घेऊन जाणें कठीण आहे ॥ ४ ॥ त्यांचें तें केविलवाणें भाषण ऐकून रहूगणराजाला वाटलें कीं, हा दोष कांहीं साऱ्या भोयांचा नाहीं, एकट्याचाच असला पाहिजे व तो संसर्ग सर्वांना बाधतो. रहूगणराजानें वडिलांची सेवा केल्यामुळें त्याच्या स्वभावांत शांति आलेली होती. तरीहि मूळ स्वभावानुसार त्याच्या मनांत या वेळीं क्रोधानें उचल खाल्ली. राखेमध्यें अग्नि आच्छादिलेला असतो व त्याचें तेज जसें कळत नाहीं, त्याप्रमाणें त्या ब्राह्मणाचेंहि तेज आच्छादित झालें होतें आणि राजाची बुद्धि तर रजोगुणानें व्याप्त झाली होती. त्यामुळें राजा त्या ब्राह्मणाशीं उपरोधिक भाषण करूं लागला ॥ ५ ॥ तो म्हणाला,—अरेरे, हे काय हो तुमचे अश्रांत श्रम! तुम्हीं एकट्यानेंच ही पालखी किती तरी लांब वाहून आणली आहे! वेळ पुष्कळच झाला खरा! त्यांतून तुमचें शरीर लठ्ठ व बळकट नाहीं; आणि म्हातारपणानें तर तुम्हांला अगदीं जर्जर करून सोडिलें आहे, ह्या तुमच्या सोबत्यांमध्यें तुझ्याइतका जरत्कारु कोणी नाहीं. अशा प्रकारें राजानें उपरोधिक

भाषण करून त्याची टर केली; परंतु तो ब्राह्मण केवळ ब्रह्मस्वरूप बनलेला होता. अज्ञानांत गुरफटून पृथिव्यादि जड द्रव्यें, इंद्रियांचे गुण, कर्मे, मन, इत्यादि सामुग्रीनें बनविलेल्या आपल्या या शेवटच्या जन्मींच्या देहावर तो 'हा मी' किंवा 'हें माझें' असा पोकळ अभिमान धरीत नव्हता. शरीर नांवाची रचना केवळ मिथ्या आहे, हें तो पक्केपणीं जाणून होता; म्हणून तो त्या राजाच्या टवाळीवर कांहींएक उत्तर न देतां मुकाट्यानें पूर्वीप्रमाणेंच पालखी वाहात चालला ॥ ६ ॥ पण त्याचा चालण्याचा क्रम पूर्वीप्रमाणेंच असल्यामुळें त्या पालखीला पुनः हिसके बसू लागले. तें पाहून तो राजा क्रोधानें संतप्त होऊन म्हणाला,—काय रे भोया, तूं तर जिवंत असून मेल्यासारखा दिसतोस ! माझा अनादर करून धन्याची आज्ञा मोडतोस काय ? तूं फार माजलास. दंडधारी अधिकारी लोकांवर दंड धारण करितो त्याप्रमाणें तुझ्यावरहि प्रयोग केला पाहिजे तेव्हांच तूं ताळ्यावर येशील ! ॥ ७ ॥ अशा प्रकारें त्या राजानें पाहिजे तशी अद्वातद्वा बडबड केली. त्याला 'मी राजा' असा अभिमान झाला होता. रजोगुण व तमोगुण यांनीं त्याचा ताठा फारच वाढत गेल्यामुळें तो भगवंताचें अत्यंत प्रीतिपात्र असा जो भरत त्याची अवहेलना करण्यास उद्युक्त झाला. तो राजा स्वतःला आपण मोठे विद्वान् आहों असें समजत असे; पण वास्तविक पाहिलें तर हा ब्राह्मणच ज्ञानसंपन्न, ब्रह्मस्वरूपाशीं तादात्म्य पावलेला, सर्व प्राणिमात्रांचा मित्र व केवळ आत्माच होता. त्याला गर्व म्हणून कसा शिवला नाहीं. राजाच्या बुद्धीला अद्यापि महायोग्याच्या आचरणाची ओळख नाहीं, हें मनांत आणून तो ब्राह्मण थोडेंसें हसत हसतच त्याच्याशीं बोलूं लागला ॥ ८ ॥

तो म्हणाला,—हे शूर राजा, मला कांहीं श्रम झाले नाहींत इत्यादि तूं जें कांहीं बोललास तें यथार्थच आहे. तुला वाटत असेल कीं, आपण कसें खोंचून बोललों; पण त्यांत खोंचण्यासारखें कांहींच नाहीं; कारण असें पाहा कीं, भार म्हणून कांहीं एखादा पदार्थ असला, आणि तो देहाला लागत असला आणि त्या देहाचा संबंध माझ्याशीं असला, तरच, 'तुम्हांला ओझें उचलण्याचे श्रम फार झाले' हें तुझें उपरोधिक बोलणें वर्मी लागणार ! तसेंच चालणाराला अमुक ठिकाणीं जावयाचें, अमुक मार्गानें जावयाचें, असें असेल तरच तुझें हें म्हणणें त्याला लागावयाचें ना ? 'तुम्हीं फारसे लठ्ठ नाहींत,' असें तूं मला बोललास; पण चैतन्याला अनुलक्षून तूं लठ्ठ आहेस असें विद्वान् लोक तर कधींच म्हणावयाचे नाहींत ॥ ९ ॥ स्थूलपणा, कृशपणा, व्याधि, क्षुधा, तृषा, भीति, कलह, इच्छा, वार्धक्य, निद्रा, रति, क्रोध, अहंकार व शोक हे सारे प्रकार देहावर अभिमान ठेवून जे जन्मास येतात, त्यांना असतात. मी तर देहाभिमानरहित आहें; म्हणून मला त्यांचा संपर्क नाहीं ॥ १० ॥ राजा, तूं मला 'जिवंत असून मेल्यासारखा आहेस' असें म्हटलेंस; पण जन्म व मरण हे जितके म्हणून विकारी पदार्थ आहेत, त्या सर्वांनाच नियमानें आहेत. हे स्तुत्य पुरुषा, 'धन्याची आज्ञा मानीत नाहींस' असा तूं मला एक दोष दिला आहेस. 'मी आणि माझा धनी' हा भाव असल्याचें जर ठाम मत

ठरेल तर मग 'आज्ञा' आणि ती 'मान्य करणें' हा शब्द शक्य होईल ॥ ११ ॥ तूं राजा आणि मी चाकर, असा भेद वाटण्याला जागा म्हटली तर व्यवहारावांचून दुसरी कांहींच दिसत नाहीं. वास्तविक पाहिलें तर धनी तरी कोण? आणि त्यानें आज्ञा तरी काय द्यावयाची? पण तुला अभिमान वाटत असेल तर हे राजा! मी तुझी कोणती सेवा करूं तें सांग ॥ १२ ॥ हे वीरा, तूं मला शिक्षा करीन म्हणतोस; पण बाबा, मी आत्मस्वरूपांत तल्लीन होऊन पिशाचानें घेरलेल्या दांडग्या किंवा मूर्ख मनुष्यासारखा वागत आलों. दांडगा व ताठेखोर समजून शिक्षा करण्याचा यत्न करशील तर तें पिष्टपेषणासारखें निरर्थकच होणार आहे ॥ १३ ॥

शुकाचार्य म्हणाले,—हे परीक्षित्‌राजा, त्या मुनिवराचा स्वभाव शांत होता. हा मनुष्यदेहालाच आत्मा मानतो याचें कारण अविद्या. भरताची अविद्या निखालस नष्ट झाली होती. तो केवळ आपलें प्रारब्धकर्म भोगून क्षीण करीत होता. त्यानें रहूगणराजाच्या भाषणाचा अनुवाद करून त्याला याप्रमाणें प्रत्युत्तर दिलें व पूर्वीप्रमाणेंच पुनः पालखी वाहण्याचा क्रम चालविला ॥ १४ ॥ हे पांडवपुत्रा, सिंधुसौवीरदेशाच्या त्या राजाला उत्तम प्रकारच्या श्रद्धेमुळें तत्त्वजिज्ञासेविषयीं अधिकार प्राप्त झाला होता. त्यामुळें हृदयांतील अहंकाराची गांठ सोडविणारें व अनेक योगग्रंथांस मान्य असें त्या द्विजवराचें भाषण कानीं पडल्याबरोबर, मी मोठा राजा आहें, असा जो त्याला गर्व झालेला होता, तो पार नाहींसा झाला. त्यानें लगेच पालखींतून खालीं उतरून त्या ब्राह्मणाच्या चरणांवर मस्तक ठेवलें व त्याजपाशीं क्षमा मागूं लागला ॥ १५ ॥ तो म्हणाला,—गुप्तरूपानें फिरणारा तूं कोणी तरी सर्वसंगपरित्याग केलेला अवधूत असावास. तूं कोणाचा कोण आहेस? आणि कोठें राहणारा आहेस? आणि येथें तुझें येणें कोणत्या कारणास्तव झालें? तूं आमच्या कल्याणासाठींच येथें आला असशील, तर शुक्लस्वरूपी भगवान् कपिलमुनि तर तूं नाहींस ना? ॥ १६ ॥ मला इन्द्राच्या वज्राची, शंकराच्या त्रिशूळाची, किंवा यमाच्या दंडाचीहि भीति वाटत नाहीं. अग्नि, सूर्य, सोम, वायु, कुबेर या लोकपालांच्या अस्त्रांचेंहि भय मला वाटत नाहीं; पण ब्रह्मकुलाचा अपमान माझ्या हातून घडल्यामुळें मात्र मला फार भीति वाटूं लागली आहे ॥ १७ ॥ यास्तव तूं कोण आहेस तें कृपा करून मला सांग. कोणतीहि आसक्ति न ठेवतां तूं एखाद्या अज्ञानी माणसाप्रमाणें फिरत आहेस; पण तुझें ज्ञान आणि पराक्रम हीं झांकलेलीं आहेत एवढेंच. वस्तुतः तुझा महिमा अपार आहे. हे साधुपुरुषा, योगज्ञानानें भरलेलीं अशीं जीं वाक्यें तूं आतां बोललास तीं मनानें देखील उलगडणें मला शक्य नाहीं ॥ १८ ॥ योगेश्वर आणि आत्मवेत्त्या ऋषींचाहि श्रेष्ठ गुरु असा जो प्रत्यक्ष भगवान् श्रीहरि त्याच्या ज्ञानकलेचा अवतार जो कपिलमुनि त्याच्याकडे मनुष्याला खरें आश्रयस्थान कोणतें तें विचारण्यासाठीं मी निघालों आहें ॥ १९ ॥ तो भगवान् कपिलच तूं असून लोकस्थिति बारीक दृष्टीनें पाहण्यासाठीं आपलें खरें स्वरूप गुप्त ठेवून फिरत आहेस काय? माझ्यासारख्या आंधळ्या

बुद्धीच्या आणि घरादारावर अत्यंत आसक्ति ठेवणाऱ्या मनुष्याला तुझ्यासारख्या योगेश्वरांचे मार्ग काय आहेत हें कसें समजणार ? ॥ २० ॥ मला माझ्या कर्मापासून श्रम होतात हें मला दिसत आहे आणि त्यांवरून खांद्यावर पालखी घेऊन जाणाऱ्या तुलाहि तसे श्रम होत असले पाहिजेत असें मीं अनुमान करतों. तसें अनुमान न केल्यास अनिष्टापत्ति प्राप्त होते. घट मिथ्या आहे असें म्हटल्यास त्यानें आणिलेलें पाणीसुद्धां त्यावरून मिथ्याच ठरेल; पण तसें ज्या अर्थीं होत नाहीं, त्या अर्थीं सर्व व्यवहारांतील घडामोड सत्य आहे असेंच मानणें अवश्य आहे ॥ २१ ॥ भाताच्या थाळीला खालून अग्नीची उष्णता लागली म्हणजे आंतील पाणी तापतें व तापलें म्हणजे तांदुळाच्या अंतर्भागाला उष्णता लागून तो शिजतो. त्याप्रमाणें देह, इंद्रियें, प्राण व मन यांच्या संसर्गामुळें त्यांचे विकार पुरुषालाहि होतात. कारण उपाधीचे धर्म उपाधीला लागतात असें दिसून येतें. ॥ २२ ॥ ज्या वेळीं जो राजा असेल, तो त्या वेळीं प्रजेचें शासन व रक्षण करितोच; ( राजा व प्रजा हा संबंध नित्य नसला तरी त्या त्या वेळेपुरता तो सत्य असतोच ); त्यामुळें परमेश्वराचा सेवक म्हणून जो अपराध्याला शासन करितो, तो पिष्टपेषण करतो असें म्हणतां येत नाहीं; कारण स्वधर्माचरणरूपानें परमेश्वराची आराधना करीत असल्यामुळें तो पापांपासून मुक्त होतो ॥ २३ ॥ महाराज, मी राजा आहें या अभिमानाच्या मदानें तुम्हांसारख्या श्रेष्ठ साधूला तुच्छ लेखिलें हें माझ्या हातून मोठें पाप घडलें आहे. सत्पुरुषांचा अपमान हें मोठें पाप आहे; पण तुम्हीं दुःखितांचे कैवारी असल्यामुळें जेणेंकरून मीं त्या पापापासून मुक्त होईन अशी कृपादृष्टि माझ्यावर करा ॥ २४ ॥ महाराज, तुम्हीं साऱ्या विश्वाचे हिंतचिंतक आणि मित्र असून अभिमानत्यागपूर्वक सर्वांकडे समानबुद्धीनें पाहणारे असल्यामुळें तुम्हांला माझ्या निंदाजनक शब्दामुळें विषाद वाटला नसला, तरी थोर पुरुषांचा आपल्या हातून अपराध घडल्यास शंकरासारख्या समर्थांचाहि नाश झाल्याशिवाय राहणार नाहीं, मग माझ्यासारख्याची कथा काय ? २५ ॥

**दहावा अध्याय समाप्त**

---

# अध्याय ११ वा

ब्राह्मण म्हणाला,—हे रहूगणराजा, तूं ज्ञानी नसूनहि, ज्ञानांत निष्णात असलेल्या पुरुषाप्रमाणें भाषणें करीत आहेस; पण एवढ्यावरून कांहीं तूं महाविद्वानांमध्यें श्रेष्ठ म्हणून गणला जाणार नाहींस. कारण, जे ज्ञानी आहेत ते ह्या लौकिक व्यवहाराला तत्त्वविचाराच्या योग्यतेचा कधीं मानीत नाहींत ॥ १ ॥ हे राजा, त्याचप्रमाणें वैदिक कर्मव्यवहारहि सत्य नव्हे. कारण, गृहस्थाश्रमसंबंधीं अनेक यज्ञांचा विस्तार वर्णन करणाऱ्या विद्यांमध्यें जोरानें प्रतिपादण्यांत येणाऱ्या वेदवचनामध्यें बहुतकरून शुद्ध व निष्काम असें तत्त्वज्ञान खरोखर आढळत नाहीं ॥ २ ॥ आतां वेदान्तशास्त्र ऐकणाऱ्या पुरुषाची सुद्धां जर व्यावहारिक कर्मांत प्रवृत्ति होते, तर त्या व्यवहाराला मिथ्या कसें म्हणतां येईल, असा येथें प्रश्न येतो; पण त्याचें उत्तर असें कीं, गृहस्थाश्रमांतील कर्मजन्य सुख, स्वप्नांतील सुखासारखेंच त्याज्य आहे, असें ज्याला स्वतःच ठरवितां येत नसेल, त्या पुरुषाला उत्तम प्रकारचा तत्त्वबोध करून देण्यास, अतिश्रेष्ठ अशीं उपनिषद्वाक्येंहि समर्थ होणार नाहींत ॥ ३ ॥ जोंपर्यंत मनुष्याचें मन रजोगुण, सत्त्वगुण आणि तमोगुण यांनीं व्याप्त झालेलें असतें, तोंपर्यंत तें मन स्वतंत्रपणें कोणाला न जुमानितां, ज्ञानेंद्रियांच्या व कर्मेंद्रियांच्या साहाय्यानें पुरुषाकडून चांगलीं किंवा वाईट अशीं अनेक कर्में करवितें ॥ ४ ॥ आणि मग वासनायुक्त आत्मरूपी, विषयासक्त, गुणांच्या योगानें चलन पावणारें, कामादिरूपानें परिणाम पावणारें, भूतेन्द्रियरूप सोळा कळांमध्यें मुख्य आणि निरनिराळ्या नांवांनीं देव, पशु, मनुष्य इत्यादि रूपें धारण करणारें असें तें मन, त्या त्या देवादि शरिरांच्या योगानें जीवाला उत्तमपणा किंवा नीचपणा प्राप्त करून देतें ॥ ५ ॥ नंतर संसारचक्रामध्यें सांपडलेल्या जीवाला छळणारें व मायेनें रचलेलें असें तें अन्तःकरण, आपल्यामध्यें असलेल्या जीवात्म्याला चिकटून राहून, दुःख, सुख किंवा तीव्र मोहासारखें दुसरें कांहीं काळानें प्राप्त झालेलें दुर्निवार फळ उत्पन्न करितें ॥ ६ ॥ जोंपर्यंत मनाचा असा क्रम चालला आहे, तोंपर्यंत जाग्रत्स्वप्नरूपानें भासणारा हा स्थूल व्यवहार निरंतर खरा दिसत असतो. यास्तव या मनालाच त्रिगुणमय निकृष्ट संसाराचें व त्रिगुणातीत उत्कृष्ट मोक्षाचें कारण म्हणतात ॥ ७ ॥ मन विषयासक्त असलें म्हणजे तें जीवाच्या संसाराला कारण होतें आणि तेंच मन निर्गुण झालें म्हणजे जीवाच्या मोक्षाला कारण होतें. तुपानें भिजलेली वात भक्षण करणारा ढळढळीत दिवा जसा तूप आहे तोंपर्यंतच काजळानें युक्त अशा ज्वाळा धारण करितो; आणि तुपाचा क्षय होतांच तो आपल्या शुद्ध तेजस्वी स्वरूपाला जाऊन मिळतो, तसें मन, विषयांमध्यें आणि त्याच्या प्राप्तीस अनुकूल असलेल्या कर्मांमध्यें आसक्त झालें म्हणजेच तें अनेक प्रकारच्या वृत्तींचा आश्रय करितें. आणि तेंच निर्गुण झालें म्हणजे तें आपल्या मूळ तत्त्वाला जाऊन मिळतें ॥ ८ ॥ हे राजा रहूगणा, पांच कर्मेन्द्रियें, पांच ज्ञानेन्द्रियें

व एक अभिमान, अशा या मनाच्या अकरा वृत्ति आहेत आणि पांच सूक्ष्म भूतें, पांच कर्में आणि एक शरीर, हे त्या वृत्तींचे आधारभूत असे अकरा विषय आहेत, असें म्हणतात ॥ ९ ॥ गंध, रूप, स्पर्श, रस आणि शब्द हे ज्ञानेन्द्रियांचे, आणि मलत्याग, संभोग, गमन, भाषण आणि कुशलता हे पांच कर्मेन्द्रियांचे विषय होत. तसेंच हें माझें भोगस्थान आहे, अशा बुद्धीनें ज्याचा स्वीकार होतो तें शरीर अकराव्या अभिमानाचा विषय आहे असें म्हणतात; परंतु कांहीं लोक, अहंकार ही एक मनाची बारावी वृत्तिच आहे असें मानून, तिचा शरीर हाच शय्यासंज्ञक बारावा विषय आहे असें म्हणतात. त्या शरीरांतच अंहकारासह जीव निजतो; म्हणून त्यास पुरुष म्हणजे शरीरसंज्ञक पुरांत शयन करणारा असें म्हणतात ॥ १० ॥ मनाच्या ह्या अकरा वृत्ति, विषय, स्वभाव, संस्कार, कर्म आणि काळ यांच्या योगानें परिणाम पावून, प्रथमतः शेंकडों प्रकारच्या, नंतर हजारों प्रकारच्या आणि शेवटीं कोट्यवधि प्रकारच्या होतात. त्या सर्वांना क्षेत्रज्ञ आत्म्याच्या अस्तित्वामुळेंच अस्तित्व प्राप्त होतें. तें त्यांना आपोआप किंवा परस्परांच्या आश्रयानें मिळालेलें नसतें ॥ ११ ॥ मायानिर्मित जीवाची उपाधि झालेलें आणि त्याच्या संसारबंधाला कारण होणारें असें जें अशुद्ध कर्म करणारें मन त्याच्या ह्या वृत्ति नित्य असून जागृति आणि स्वप्न ह्या अवस्थांमध्यें त्या प्रगट होत असतात व सुषुप्तीमध्यें लय पावतात; पण त्या तिन्ही अवस्थांचा साक्षी असा क्षेत्रज्ञ आत्मा त्यांना नित्य पाहत असतो ॥ १२ ॥ तो क्षेत्रज्ञ, म्हणजेच व्यापक, जगत्कारणभूत, पूर्ण, प्रत्यक्ष, स्वप्रकाश, जन्मरहित, ब्रह्मादिकांचा नियंता व आपल्या स्वाधीन असलेल्या मायेनें जीवांचें नियन्त्रण करणारा, नारायण भगवान् वासुदेव होय ॥ १३ ॥ जसा वायु, बाहेर असूनहि यच्चयावत् स्थावरजंगमात्मक प्राण्यांच्या शरिरांत प्राणरूपानें प्रवेश करून त्यांचें नियमन करितो, त्याप्रमाणें प्रपंचातीत व सर्वांचा अन्तर्यामी असा परमात्मा भगवान् वासुदेव, ह्या जगामध्यें प्रविष्ट होऊन त्यांचें नियमन करितो ॥ १४ ॥ हे राजा, देहधारी प्राणी जोंपर्यंत ज्ञानोत्पत्तीच्या योगानें ह्या मायेला दूर झुगारून देऊन सर्वसंगपरित्याग करून देऊन व कामादि षड्रिपूंना जिंकून आत्मतत्त्व जाणत नाहीं, तोंपर्यंत तो या संसारांत भ्रमण पावतो ॥ १५ ॥ तसेंच जोंपर्यंत या जीवानें, आपल्या उपाधिभूत मनाला, 'हें संसारताप पिकण्याचें शेत आहे' असें जाणिलें नाहीं, तोंपर्यंत तो या संसारामध्यें भ्रमण पावतो. कारण तें मन तोंपर्यंत त्याच्यामध्यें शोक, मोह, राग, प्रीति, लोभ आणि वैर यांचे संबंध आणि अहंकार उत्पन्न करीत असतें ॥ १६ ॥ यास्तव हे राजा, तूं सावध राहून गुरुरूपी हरीची चरणसेवा कर, आणि त्या सेवारूप शस्त्रानें (खरोखर असतांहि) उपेक्षा केली असतां वृद्धिंगत होणाऱ्या आत्मस्वरूपाचा विसर पाडणाऱ्या आपल्या महाबलाढ्य अशा मनोरूपी शत्रूचा वध कर ॥ १७ ॥

## अकरावा अध्याय समाप्त

---

# अध्याय १२ वा

रहूगण म्हणाला,– हे अवधूता, तूं साक्षात् ईश्वर असून लोकांच्या संरक्षणासाठीं हा देह धारण केला आहेस; आपल्या स्वरूपभूत परमानंदाच्या प्रकाशामुळें देहाला तूं तुच्छ मानिलें आहेस. तुला मी वारंवार नमस्कार करितों. हा अधम ब्राह्मणाचा वेष घेऊन आपला नित्यानुभव गुप्त राखिला आहेस. तुला माझा नमस्कार असो ॥ १ ॥ हे मुने, ज्वररूप रोगानें पीडिलेल्या पुरुषाला गोड औषध मिळावें अथवा ग्रीष्मऋतूंतील उन्हानें तापलेल्या पाण्याला गार गंधोदक मिळावें त्याप्रमाणें निंद्य अशा देहाविषयींच्या अभिमानरूप सर्पानें विवेकदृष्टीला दंश केल्यामुळें अंध झालेल्या मला तुझें हें भाषण म्हणजे अमृततुल्य औषधच मिळालें आहे ॥ २ ॥ यास्तव माझ्या मनांत असलेला संशय मी तुला मागाहून विचारीन; परंतु आतां अध्यात्मयोगानें गुंफिलेलें जें भाषण केलें, त्यांतील गूढार्थ मला समजेल अशा स्पष्ट रीतीनें प्रथम उघड करून सांग. तो ऐकण्याची माझ्या चित्ताला फार उत्सुकता वाटत आहे ॥ ३ ॥ हे योगेश्वरा, भार वाहणें इत्यादि कर्माचें, श्रम इत्यादि फळ प्रत्यक्ष दिसत असलेल्या खऱ्या व्यवहारास कारण असूनहि हें खरें नाहीं, तें केवळ व्यवहारास आधारमात्र आहे, तें प्रत्यक्ष तत्त्वविचार करण्यास समर्थ नाही, असें तूं म्हणालास तें ऐकून माझें मन घोटाळ्यांत पडलें आहे. ॥ ४ ॥

ब्राह्मण म्हणाला,–हे राजा, पृथ्वीचाच एक विकार कोणत्या तरी कारणामुळें तो पृथ्वीवर हिंडूं लागला म्हणजे त्यालाच हा ओझें वगैरे वाहणारा मनुष्य, असें नांव प्राप्त होतें आणि जो हिंडत नाहीं त्याला दगड इत्यादि नांव मिळतें, इतकाच काय तो भेद आहे. परंतु देह जड असल्यामुळें त्याला भार किंवा श्रम हे मुळींच होत नाहींत. त्या पृथ्वीविकाररूप देहाच्याहि पायांवर घोटे, पोटऱ्या, गुडघे, मांड्या, कमर, वक्षःस्थळ, मान व खांदे हे अवयव रचिलेले आहेत ॥ ५ ॥ लांकडाच्या केलेल्या पालखींत सौवीर देशाचा राजा रहूगण ह्या नांवाचा एक मातीचाच पुतळा खांद्यावर बसला आहे. त्या पुतळ्यावर 'तूं हा आपला देह आहे' असा अभिमान धारण करून मी सिंधुदेशाचा राजा आहें, अशा दुष्ट मदानें आंधळा होऊन राहिला आहेस ॥ ६ ॥ ज्यांच्याविषयीं वाईट वाटावें अशा अति कष्ट भोगून दीन झालेल्या या भोयांना वेठीला धरून त्रास देणारा तूं निर्दय व उद्धट आहेस. यास्तव मी लोकांचें रक्षण करणारा आहे, अशी आपली प्रौढी मिरविणारा तूं वृद्ध जनांच्या सभेमध्यें मुळींच शोभणार नाहींस ॥ ७ ॥ जर आपण नित्य या स्थावरजंगमात्मक जगाची उत्पत्ति आणि प्रलय पृथ्वीच्याच ठिकाणीं होतात असें जाणतों, तर केवळ त्याहून दुसरें कांहीं व्यवहाराचें कारण आहे, असें अनुमान करतां येईल काय ? असेल तर सांग ॥८॥ प्रसिद्ध असलेल्या पदार्थांचासुद्धां असाच प्रकार सांगितला आहे. कारण सूक्ष्म

अशा परमाणूमध्यें तिचाहि लय होतो. आतां ज्या परमाणूंच्या समूहानें पृथ्वी हा विशेष आकार बनला आहे, ते परमाणु सत्य म्हणावें तर तसेंहि नाहीं. ते परमाणुसुद्धां अज्ञानामुळें मनानें कल्पिलेलेच आहेत ॥ ९ ॥ याप्रमाणें दुसरेंहि जें कांहीं, बारीक, मोठें, आंखूड लांब, कारण-कार्य, चेतन-जड असें द्वैत भासत असेल तें सर्वहि विषय, स्वभाव, संस्कार, काल आणि कर्म या नांवांनीं प्रसिद्ध असलेल्या भगवंताच्या मायेनेंच केलेलें आहे असें जाण ॥ १० ॥ ज्ञान हेंच परमार्थरूपी सत्य होय. तें अति शुद्ध, एक, बाह्याभ्यंतरभेद-रहित, परिपूर्ण, अंतर्मुख व निर्विकार आहे. त्यालाच भगवान् असें नांव असून ज्ञानी लोक त्यालाच वासुदेव असें म्हणतात ॥ ११ ॥ हे रहूगणराजा, हें ज्ञान पुरुषाला महासमर्थ साधूंच्या चरणधूळीचें स्नान घडल्यावांचून केवळ तपश्चर्येनें प्राप्त होत नाहीं. तसेंच तें यज्ञानें, अन्नसमर्पणानें किंवा गृहस्थाश्रमांत राहून पुष्कळ परोपकार केल्यानेंहि मिळत नाहीं किंवा वेदाभ्यासानें अथवा उदकाची, अग्नीची व सूर्याची उपासना केल्यानेंहि प्राप्त होत नाहीं ॥ १२ ॥ तर सत्पुरुषांच्या संगतीमध्यें मिळतें. सत्पुरुषाचें ठायीं विषयसुखासंबंधीं कथांचा विघात करणारें, भगवंताच्या गुणांचे वर्णनच निरंतर चाललें असतें व तें श्रवण केलें असतां त्यापासून मुमुक्षु पुरुषाला परमेश्वराविषयीं निर्मळ अशी बुद्धि प्राप्त होते ॥ १३ ॥ असो. हे राजा, मी पूर्वीं भरतनामक राजा असून दिसलेल्या व ऐकलेल्या सर्व वस्तूंवरील आसक्तीचें बंधन तोडून भगवंताच्या आराधनेचीच इच्छा करीत होतों; परंतु एका हरिणाची संगत धरिल्यामुळें, माझ्या पुरुषार्थाची हानि होऊन मी दुसऱ्या जन्मीं हरिण झालों ॥ १४ ॥ परंतु हे वीरा, त्या हरिणाच्या जन्मांत देखील श्रीकृष्णाचें पूजन केल्या-मुळें प्राप्त झालेली आत्मस्वरूपाची स्मृति मला सोडून गेली नाहीं; म्हणून मी आतां जनसंगाच्या भीतीमुळें अगदीं असंग झालों आहें आणि आपलें स्वरूप प्रगट न करितां लोकांमध्यें संचार करीत असतों ॥ १५ ॥ म्हणून सर्वसंग सोडून देणाऱ्या साधूंच्या समागमानें प्राप्त झालेल्या ज्ञानरूप खड्गानें मनुष्यानें या जन्मामध्येंच मोहरूप बंधन तोडून टाकावें; म्हणजे भगवंताच्या लीलांचें वर्णन व श्रवण यांच्या योगानें आत्मस्वरूपाची स्मृति त्याला प्राप्त होईल व ती संसारमार्गाच्या पलीकडे जाऊन श्रीहरीशीं ऐक्य पावेल ॥ १६ ॥

**बारावा अध्याय समाप्त**

---

# अध्याय १३ वा

ब्राह्मण म्हणाला,—हे रहूगणराजा, दुस्तर अशा मार्गांत मायेनें पोचविलेला, रज, तम व सत्त्व, या तीन गुणांनीं विभागून ठेविलेलीं कर्मेंच आपणांस कर्तव्य आहेत एवढेंच पाहाणारा व द्रव्य मिळविण्याच्या कामीं तत्पर असा व्यापाऱ्यांचा एक तांडा फिरतां फिरतां या भवारण्यांत पडला असून त्याला तेथें सुख प्राप्त होत नाहीं ॥ १ ॥ हे राजा, या तांड्याचा पुढारी चांगला नसल्यामुळें त्या भवाटवीमध्यें सहा चोर त्याला लुटतात आणि कोल्हेदेखील, ते व्यापारी सावध नाहींत असें पाहून त्यांच्या जवळ जातात व जसे लांडगे मेंढ्याला घेरून जिकडेतिकडे ओढितात, त्याप्रमाणें त्याला ओढितात ॥ २ ॥ एखादे वेळीं पुष्कळ वेली, गवत व जाळ्या यांमुळें प्रवेश करण्यास अशक्य अशा ठिकाणीं उग्र अशा डांसांचा व रानमाश्यांचा त्याला उपद्रव होतो. केव्हां केव्हां गंधर्वनगर ह्याच्या दृष्टीस पडतें. आणि केव्हां केव्हां तर अति चंचल असें कोलतीसारखें पिशाचहि त्याच्या दृष्टीस पडतें ॥ ३ ॥ हे राजा, एखादे वेळीं तो तांडा घर, पाणी व द्रव्य ह्यांच्या आशेनें स्वाभाविकपणें त्या अरण्यांत जिकडेतिकडे सैरावैरा धावतो आणि एखादे वेळीं त्याचे डोळे धुळीनें भरून जातात व बावटळीमुळें उठलेल्या धुळीनें धुंद झालेल्या दिशाहि त्याला दिसत नाहींशा होतात ॥ ४ ॥ एखादे वेळीं गुप्तपणें फिरणाऱ्या माशांच्या कठोर शब्दांनीं त्याच्या कानाला फार त्रास होतो, तर एखादे वेळीं घुबडांच्या शब्दांनीं त्याच्या मनाला दुःख होतें. केव्हां तो पापी वृक्षांचा * आश्रय करितो, तर केव्हां केव्हां मृगजळांच्या मागेंहि धांवतो ॥५॥ केव्हां तो शुष्क झालेल्या नद्यांमध्यें शिरतो व ठेंच लागून पडतो, तर केव्हां केव्हां अन्न न मिळाल्यामुळें आपल्या बांधवांजवळ भिक्षाहि मागतो. केव्हां तो वणव्यांत सांपडून अग्नीच्या योगानें संतप्त होतो, तर केव्हां केव्हां राक्षसांनीं त्याचे प्राण हरण केले म्हणजे तो खिन्न होतो ॥ ६ ॥ एखादे वेळीं शूर पुरुषांनीं त्याचें द्रव्य हरण केलें म्हणजे खिन्नचित्त होऊन तो शोकानें मूर्च्छाहि पावतो, आणि एखादे वेळीं गंधर्वपुरामध्यें गेला म्हणजे क्षणभर तो सुख वाटल्यासारखा आनंदांत निमग्न असतो ॥ ७ ॥ केव्हां चालत असतांना त्याच्या पायांना कांटे व खडे लागतात, तर केव्हां केव्हां पर्वतावर चढण्याची इच्छा करीत असून, तें घडलें नाहीं म्हणजे तो खिन्न होऊन राहतो. कुटुंबाचें पोषण करीत असतां तो भुकेनें व्याकुळ झाल्यामुळें कुटुंबांतील लोकांवर वारंवार संतापतो ॥ ८ ॥ केव्हां अजगर सर्प गिळून टाकतो व मग त्याला कांहींच समजत नाहीं, तसें एखादे वेळीं लोकांनीं ह्याला प्रेततुल्य समजून अरण्यांत टाकून दिलें असतां तेथें सर्प त्याला दंश करतात व त्यामुळें तो आंधळा होऊन अंधाऱ्या

---

* दिवसा बेहड्याच्या झाडाची छाया आणि रात्रीं पिंपळाची छाया दुष्ट असते असें म्हणतात. '**दिवा बिभीतकच्छाया रात्रौ बौधिद्रुमस्य च ।**

विहिरींत पडतो ॥ ९ ॥ केव्हां केव्हां तो क्षुद्र प्रकारचा रस शोधूं लागला म्हणजे तेथें असलेल्या मधमाशा त्याला पीडा देतात व त्यामुळें तो दुःखित होतो. तेथें मोठ्या कष्टानें त्याला तो रस मिळाला तरी दुसरे कोणी तो त्याच्यापासून बलात्कारानें हरण करितात, आणि त्यांनाहि तो जिंकील तर तिसरेच ते घेऊन जातात ॥ १० ॥ एखादे प्रसंगीं तो थंडी, ऊन्ह, वारा व पाऊस ह्यांपासून आपलें रक्षण करण्यास असमर्थ असतो. केव्हां केव्हां परस्परांशीं थोडाबहुत व्यापार करूं लागला म्हणजे तो द्रव्याबद्दल लोकांना फसवूं लागतो आणि म्हणून त्यांच्याशीं त्यांचा द्वेष उत्पन्न होतो ॥ ११ ॥ केव्हां केव्हां तर त्या अरण्यामध्यें त्याचें धन संपून गेलें म्हणजे निजावयास शय्या, बसावयास आसन व राहावयास घर हीं त्याला मिळत नाहींत व मग तो लोकांपाशीं मागूं लागतो; पण तीं त्याला मिळत नाहींत. मग तो लोकांच्या वस्तूंचा अभिलाष धरूं लागतो व त्यामुळें त्याचा अपमान होतो ॥ १२ ॥ याप्रमाणें परस्परांशीं द्रव्यव्यवहाराच्या प्रसंगानें त्याचें वैर वाढलें असतां तो तांडा एकमेकांशीं विवाहसंबंध करितो व या भवाटवींतील मार्गांत हिंडतांना अनेक संकटें, धनाचा नाश व द्वेषादिक उपसर्ग यांच्या योगानें तो मेल्यासारखा होतो ॥ १३ ॥ अशा प्रकारचा तो व्यापाऱ्यांचा मेळा, आपल्यांपैकीं मरण पावलेल्या लोकांना तेथेंच टाकून, नवीन जन्मलेल्या बालकांना मात्र घेऊन जातो. आपल्या पूर्वस्थळाला तो अजूनहि येत नाहीं. हे वीरा, यांतील कोणी एखादा समर्थ पुरुषहि या मार्गाच्या पलीकडे जो सुखरूप योगमार्ग आहे त्याला जाऊन पोंचत नाहीं ॥ १४ ॥ ज्यांनीं मोठाले दिग्गज जिंकले आहेत असे शूर पुरुषहि, पृथिवी माझी आहे, अशा अभिमानानें वैर धरून परस्परांशीं भांडतां भांडतां युद्धामध्यें मरून जातात; परंतु वैरभावरहित संन्यासी ज्या स्थानास जातो त्या स्थानास मात्र ते जाऊन पोंचत नाहींत ॥१५॥ तो तांडा, क्वचित्प्रसंगीं वेलींच्या लहान लहान फांद्यांचा आश्रय करून त्या आश्रयानें राहणाऱ्या व अस्पष्ट वाणी उच्चारणाऱ्या पक्ष्यांवर प्रेम धारण करून त्यांच्या ठिकाणीं आसक्त होतो. एखादे वेळीं सिंहाच्या समूहाला भिऊन तो बगळे, कंक व गिधाडे यांच्याशींहि सख्य करतो ॥ १६ ॥ आणि त्यांनीं फसविलें म्हणजे हंसांच्या कळपांत शिरतो व तोहि आवडत नाहींसा झाला म्हणजे तो वानरांकडे जातो आणि त्यांना अनुरूप असे भोग भोगूत इंद्रियें अत्यंत सुख पावलीं म्हणजे तेथें परस्परांच्या तोंडांकडे पाहत असतां त्याला आपलें आयुष्य संपत आलें आहे याचाहि विसर पडतो ॥ १७ ॥ वृक्षांवर क्रीडा करण्याच्या इच्छेनें तो स्त्रीपुत्रकलत्रांविषयीं आसक्त व मैथुनेच्छेनें दीन होऊन आपणांस प्राप्त झालेलें बंधन तोडण्यास असमर्थ होतो. एखादे वेळीं असावधपणामुळें पर्वताच्या गुहेंत तो पडत असतां त्या गुहेंत असलेल्या हत्तीला भिऊन अधांत्री असलेल्या वेलीलाच धरून राहतो ॥ १८ ॥ हे शत्रुदमना रहूगणा, ह्या संकटांतून तो कदाचित् दैवयोगानें सुटला, तरी पुनरपि त्या व्यापाऱ्यांच्या मेळ्यांत प्रवेश करून पूर्वीप्रमाणें रमतो. मिळून मायेनें ह्या मार्गामध्यें आणून सोडलेला व भ्रमण पावणारा कोणीहि पुरुष आपलें इतिकर्तव्य काय हें जाणत नाहीं ॥ १९ ॥ हे रहूगणा, तूंहि ह्या मार्गांत शिरला आहेस; म्हणून आतां असें कर कीं,

प्राण्यांना शिक्षा करण्याचें सोडून देऊन सर्वांशीं मैत्री ठेव आणि मन कोठेंहि आसक्त होऊं न देतां भगवंताच्या सेवेनें तीक्ष्ण झालेल्या ज्ञानरूप खड्गाचा स्वीकार करून आणि कामादिक शत्रू जिंकून या संसारमार्गाच्या पैलपारास निघून जा ॥ २० ॥

राजा म्हणाला,—अहो, मनुष्यजन्म हेंच सर्व जन्मांचें कल्याणकारक होय. स्वर्गादि लोकांमध्यें देवादिकांचे जन्म मिळवून तरी काय करावयाचें आहे ? त्या जन्मामध्यें भगवंताची कीर्ति गाऊन ज्यांनीं आपलीं अंतःकरणें शुद्ध करून घेतलीं आहेत त्या तुम्हांसारख्या सत्पुरुषाचा विपुल समागम घडत नाहीं ॥ २१ ॥ निरंतर सेवन केलेल्या तुझ्या चरणकमलाच्या धुळीनें निष्पाप झालेल्या पुरुषाला भगवंताच्या ठिकाणीं निर्मल भक्ति प्राप्त होते यांत कांहीं आश्चर्य नाहीं. कारण मला तुझा समागम दोन घटिका मात्र घडलेला असतां, तेवढ्यानेंहि कुतर्कांनीं दृढमूल झालेला माझा अविवेक नष्ट झाला आहे ॥ २२ ॥ असो. सर्व वृद्धांना माझा नमस्कार असो, तसाच लहान बालकांनाहि नमस्कार असो, तरुणांना माझा नमस्कार असो, तसा बटु आदिकरून सर्व स्वरूपें धारण करणाऱ्या सत्पुरुषांना माझा नमस्कार असो. जे ब्रह्मवेत्ते पुरुष अवधूताची स्वरूपे धारण करून पृथ्वीवर संचार करीत असतात, त्यांपासून राजाचें कल्याण होवो ॥ २३ ॥

शुकाचार्य म्हणाले,—हे परीक्षित् राजा, याप्रमाणें त्या ब्रह्मर्षीनें आपला अपमान करणाऱ्या अशा त्या सिंधुदेशाधिपति रहूगण राजाला अत्यंत दयाळूपणें आत्मतत्त्वाचा उपदेश केला असतां, राजानें सदय अन्तःकरणानें गहिंवरून त्याच्या चरणांना वंदन केलें. तेव्हां भरती आलेल्या समुद्राप्रमाणें भरतमुनि आनंदानें भरून गेला आणि इंद्रियांनीं उठविलेल्या मनांतील लाटा ज्याच्या शांत झालेल्या आहेत असा तो या भूमीवर संचार करूं लागला ॥ २४ ॥ त्या रहूगणराजालाहि सज्जनांच्या समागमामुळें परमात्म्याचें तत्त्व कळून आलें आणि त्यामुळें त्यानें लगेच आत्म्याच्या ठिकाणीं अविद्येनें आरोपण केलेली, देहच आत्मा होय, अशी बुद्धि सोडून दिली. हे राजा, याप्रमाणें भगवंताचा आश्रय करणाऱ्या भक्तासारख्याचा समागम करणाऱ्या रहूगणासारख्यालाहि तत्काळ देहाहंकार टाकण्याचें सामर्थ्य प्राप्त होतें ॥ २५ ॥

परीक्षित्‌राजा म्हणाला,—महाभगवद्भक्त शुकाचार्य हो, तुम्ही अत्यंत ज्ञानसंपन्न आहां. वाण्यांच्या समुदायाच्या रूपकानें जो हा जीवसमूहाचा संसारमार्ग तुम्हीं सांगितला, तो सुज्ञांनाच नीटपणें कळण्यासारखा आहे. अशिक्षित लोकांना तो सहज कळणार नाहीं; यास्तव त्या दुर्बोध वर्णनाचा अर्थ आम्हांला समजेल अशा उघड अर्थाच्या शब्दांनीं सांगावा ॥ २६ ॥

**तेरावा अध्याय समाप्त**

---

# अध्याय १४ वा

परीक्षितराजानें प्रश्न केला असतां शुकाचार्य म्हणाले,—हे राजा, माया ही षड्गुणैश्वर्यसंपन्न अशा सर्वसमर्थ विष्णूच्या स्वाधीन असून देहालाच आत्मा मानणाऱ्या जीवांना सत्त्वादिक गुणभेदांमुळें उत्पन्न झालेलीं चांगलीं, वाईट व मिश्र अशीं कर्में तिच्यामुळें प्राप्त होतात; त्या योगानें त्याचे नाना प्रकारचे देह उत्पन्न होतात. या देहांचा परस्परांशीं वियोग किंवा संयोग होणें म्हणजेच हा अनादिकाळापासून चालत आलेला संसार होय. श्रोत्र, त्वचा, नेत्र, जिव्हा, घ्राण व मन हीं सहा इंद्रियें, म्हणजे त्या जीवांचीं संसाराचा अनुभव घेण्याचीं साधनें होत. अरण्यांतील कठिण मार्गाप्रमाणें हा संसारमार्गसुद्धां चालून जाण्यास कठीण आहे. द्रव्य मिळविण्यासाठीं बाहेर पडलेला व्यापाऱ्यांचा तांडा वाट चुकून जसा भयंकर अरण्यांत जाऊन पडतो, त्याप्रमाणें हा जीवांचा समुदायहि स्वतःच्या देहानें आचरण केलेल्या कर्मांचा अनुभव घेत असतां स्मशानाप्रमाणें अत्यंत अपवित्र अशा संसाररूप गहन अरण्यांत गेलेला आहे. त्या ठिकाणीं त्याचे व्यापार निष्फळ होऊन अनेक विघ्नांनीं व्याप्त झालेले आहेत. तथापि अजूनहि त्या संसारतापाचा नाश करणाऱ्या हरिरूप गुरूच्या चरणकमलावर भ्रमरांप्रमाणें वास करणाऱ्या साधूंच्या भक्तिमार्गाला तो जीवसमुदाय अनुसरत नाहीं. या संसाररूप अरण्यामध्यें इंद्रिय नांवाचे सहाजण वावरत असून कर्मांच्या दृष्टीनें पाहिलें तर ते चोरच आहेत ॥ १ ॥ कसे तें पाहा. धर्माचरणाला उपयोगी पडावें म्हणून पुरुष मोठ्या संकटानें धन मिळवितो. ईश्वराची पूजा-अर्चा करणें हा त्याचा धर्म असून तो परलोकांत त्याला उपयोगी पडतो. असें असतां धर्माविषयीं उपयोगी पडणारें तें धन, हे इन्द्रियनामक चोर लुटतात. सुस्वरूपाचें दर्शन, स्त्रियांचा समागम, गायनादिकांचें श्रवण, पक्वान्नांचें सुग्रास भोजन, सुगंधी पदार्थांचा वास, विषयांचा नित्य विचार इत्यादिक गृहविषयक क्षुद्र उपभोगांच्या नादीं लागून ते मनुष्याची बुद्धि भ्रष्ट करतात व तो विषयासक्त झाला म्हणजे भामटे लोक एखाद्या श्रीमंताला दुर्व्यसनांच्या नादीं लावून जसें त्याचें द्रव्य लुटतात, तसे हे इंद्रियरूप चोर मनुष्यांची धर्मबुद्धि नष्ट करितात ॥ २ ॥ आतां त्या संसारमार्गांत स्त्रीपुत्र इत्यादि नांवांचे कुटुंबांतील लोक असतात; परंतु त्यांचीं कर्में पाहिलीं, तर ते लांडगे किंवा कोल्हेच समजले पाहिजेत. कारण, धनगर संरक्षण करीत असतांहि त्याच्या मेंढ्या, लांडगे जसे त्याच्या देखत हरण करितात, त्याचप्रमाणें अतिलोभी अशा त्या कुटुंबी पुरुषानें संरक्षण केलेलें धन, त्याची इच्छा नसतां त्याच्या देखत ते स्त्रीपुत्रादिक हरण करितात ॥ ३ ॥ राजा, प्रतिवर्षी शेताची नांगरकी होत असतांहि, त्यांतील गवताचीं बीजें जळालीं नसल्यामुळें पुनः पेरणीच्या वेळीं त्यांत जाळ्या, गवत व वेली हीं उगवून पर्वताच्या गुहेसारखें तें दुर्गम होतें. हा गृहस्थाश्रम हें देखील तसें कर्मक्षेत्रच असून त्यांतील कर्मांचा सर्वस्वीं

नाश कधींहि होत नाहीं. हा गृहस्थाश्रम म्हणजे विषयवासनांचा करंडाच आहे ॥ ४ ॥ त्या गृहस्थाश्रमात जीव एकदां प्रविष्ट झाला म्हणजे माश्या व डांस यांसारख्या दुष्ट अशा नीच पुरुषांचा व टोळ, पक्षी, चोर, उंदीर इत्यादिकांचा त्याच्या शरिराबाहेर वावरणाऱ्या द्रव्यरूप प्राण्यांना सारखा उपद्रव होत असतो; तथापि तो जीव त्यांतच कोठें तरी फिरत राहतो. अविद्या, भोगेच्छा व कर्मे ह्यांतच त्याचें मन गढून जाऊन त्याची दृष्टि विपर्यस्त होते व आकाशांत भासणाऱ्या गंधर्वनगराप्रमाणें वस्तुतः असत्य असलेला हा मनुष्यलोक त्याला खरा असा दिसूं लागतो ॥ ५ ॥ तेथें तो पान, भोजन व मैथुन इत्यादि व्यसनांमध्यें लंपट होऊन, मृगजळासारख्या विषयांच्या मागें लागतो ॥ ६ ॥ अरण्यांत थंडीनें पीडिलेला मनुष्य आपणास अग्नि मिळेल ह्या आशेनें जळक्या कोलतीसारख्या भासणाऱ्या पिशाचालाच धरूं पाहतो, त्याप्रमाणें रजोगुणमय बुद्धीचा हा जीवसमुदाय, केव्हां केव्हां सर्व दोषांचें घरच असें जें अग्निविष्ठारूप सुवर्ण तें मिळवूं पाहतो ॥ ७ ॥ कधीं कधीं घर, पाणी, द्रव्य इत्यादि स्वतःच्या अनेक उपजीविकासाधनांचा अभिमान धारण करणारा जीवसमूह ह्या संसाररूप अरण्यांत इकडेतिकडे धांवत असतो ॥८॥ वावटळीची जिला उपमा शोभते अशा मोहक स्त्रीनें केव्हां त्याला मांडीवर बसविलें असतां तिच्याविषयींच्या तात्कालिक प्रेमानें त्याची बुद्धि अतिशय मलिन होते व सर्व मर्यादा सोडून हा जीवसमूह डोळयांत धूळ पडल्यासारखा रात्रीं संचार करणाऱ्या पिशाचांप्रमाणें दिशांच्या ठिकाणीं असणाऱ्या साक्षीभूत देवतांना जाणत नाहींसा होतो ॥ ९ ॥ एखादे वेळीं त्याला विषयांचें खोटेंपण कळून आलें तरी देहाभिमानामुळें त्याची स्मृति नष्ट झालेली असते व त्यामुळें तो मृगजलासमान असलेल्या त्या विषयांकडेच पुनः धांवत असतो ॥ १० ॥ एखादे वेळीं घुबडें व रानमाश्या यांच्या शब्दांसारख्या भयंकर रीतीनें किंवा राजाच्या अधिकाऱ्यांनीं त्याची क्रोधावेशानें परोक्ष किंवा अपरोक्ष निर्भर्त्सना केली असतां, त्याच्या हृदयाला अत्यंत दुःख होतें ॥ ११ ॥ पूर्वजन्मींच्या पुण्याचा उपभोग घेऊन झाल्यावर तो जीवसमूह धनिक लोकांच्या मागें लागतो; परंतु वस्तुतः हे धनिक लोक काजरा, श्वेतकाबळी इत्यादि पापवृक्ष, पापवल्ली व विषयुक्त कूप ह्यांसारखेच निरुपयोगी असून त्यांचें द्रव्य इहपरलोकीं कोठेंच कामाला लागण्यासारखें नसल्यामुळें ते जिवंत असून मेल्यासारखेच असतात. अर्थात् त्यांच्या मागें लागून तोहि तसाच जिवंतपणींच मेल्यासारखा होतो ॥ १२ ॥ एखादे वेळीं दुष्टांच्या संगतीनें त्याची बुद्धि फसून जाते आणि मग पाणी नसलेल्या नदींत अडखळून पडावें, तसा तो इहलोकीं व परलोकींहि दुःख देणाऱ्या अशा पाखंडधर्मांत जाऊन पडतो ॥ १३ ॥ अशा स्थितींत शत्रूंनीं दिलेल्या पीडांमुळें याला जेव्हां अन्न मिळेनासें होतें, तेव्हां हा आपल्या पित्याला किंवा पुत्रांना, अथवा पित्याची किंवा पुत्रांची, दर्भाच्या काडीसारखी यत्किंचित् वस्तु ज्याच्याजवळ असेल त्याला खावयास उठतो ॥ १४ ॥ एखादे वेळीं आवडत्या गोष्टींनीं रहित असलेल्या परिणामाचें दुःख हेंच फळ आहे अशा वणव्यासारख्या घरांमध्यें तो येऊन पडतो व तेथें शोकरूपी अग्नीनें ह्याचें सर्वांग पोळूं लागलें म्हणजे त्याला मोठें वैराग्य

प्राप्त होतें ॥ १५ ॥ केव्हां कालगतीनें राजाचे अधिकारी त्याला प्रतिकूळ होतात व राक्षसासारखे ते अधिकारी ह्याचे धनरूप असे प्रियप्राण हरण करितात, तेव्हां ह्याचीं हर्षादिक जीवलक्षणें नाहींशीं होतात व हा अगदीं मेल्यासारखा होतो ॥१६॥ एखादे वेळीं मनोरथानें प्राप्त झालेले पितृपितामहादिक मिथ्याभूत पदार्थास ते खरे आहेत असें तो मानितो व त्यांपासून मिळणाऱ्या स्वप्नासारख्या क्षणिक सुखाचा अनुभव घेतो ॥ १७ ॥ केव्हां केव्हां हा गृहस्थाश्रमांतील कर्मविधीच्या विस्ताररूप पर्वतावर आरोहण करण्याची इच्छा करीत असतां लोकांच्या दुःखांनीं ह्याचें मन अगदीं खचून जातें आणि कांटे व खडे ह्यांनीं भरलेल्या शेतांत प्रवेश करीत असल्याप्रमाणें तो दुःख पावतो ॥ १८ ॥ कधीं कधीं दुःसह अशा जठराग्नीनें ह्याचें धन हरण केलें असतां, हा आपल्या कुटुंबांतील मनुष्यांवर रागावतो ॥ १९ ॥ तोच पुनः निद्रारूप अजगरानें गिळून टाकिला असतां अज्ञानरूप गाढ अंधकारामध्यें मग्न होतो आणि निर्जन अरण्यामध्यें टाकलेल्या प्रेताप्रमाणें निमग्न झाल्यामुळें त्या वेळीं ह्याला दुसऱ्या कशाचेंहि ज्ञान होत नाहीं ॥ २० ॥ एखादे वेळीं दुर्जनरूप सर्पांनीं ह्याचे गर्वरूप दांत पाडून टाकिले असतां त्याला एक क्षणभर सुद्धां झोंप येत नाहीं व अंतःकरणास व्यथा झाल्यामुळें त्याचें ज्ञान क्षीण होऊन शेवटीं काळोख्या विहिरीमध्यें पडणाऱ्या आंधळ्याप्रमाणें हा मोहांत पडतो ॥ २१ ॥ केव्हां केव्हां विषयरूप मधाच्या थेंबाचा शोध करितां करितां हा परस्त्री व परधन हरण करूं लागतो, तेव्हां राजा अथवा स्त्रीचे किंवा धनाचे मालक ह्याला ठार मारितात व त्यामुळें तो अपार नरकामध्यें जाऊन पडतो ॥ २२ ॥ हे राजा, असें आहे म्हणून ह्या प्रवृत्तिमार्गामध्यें केलेलें कर्मच जीवात्म्याला या लोकीं व परलोकींहि जन्म प्राप्त होण्यास कारण आहे असें म्हणतात ॥ २३ ॥ कदाचित् हा पुरुष त्या राजादिकांच्या बंधांतून जरी मुक्त झाला, तरी ज्या वस्तूकरितां हा बंधांत होता ती वस्तु ह्याच्यापासून कोणी देवदत्त हरण करितो आणि त्या देवदत्तापासूनहि तिसराच कोणीं विष्णुमित्र हरण करितो ॥ २४ ॥ केव्हां केव्हां थंडी, वारा आदिकरून अनेक आधिदैविक, आध्यात्मिक व आधिभौतिक अशा दुःखद अवस्थांचें निवारण करण्यास असमर्थ होणारा हा प्राणी अपार चिंतेनें खिन्न होतो ॥२५॥ एखादे वेळीं परस्परांमध्यें द्रव्यादिकांच्या देण्याघेण्याचे व्यवहार करीत असतांना तो दमडीइतकें किंवा त्याच्यापेक्षांहि कमी द्रव्य लोकांपासून फसवून घेऊं पाहतो व त्यामुळें दुसऱ्या लोकांशीं त्याचें वैर उत्पन्न होतें ॥२६॥राजा, या संसारमार्गामध्यें आतां सांगितलेले हे उपसर्ग आहेत. तसेंच त्यांत सुख, दुःख, प्रीति, द्वेष, भय, अभिमान, पिशाचपीडा, शोक, मोह, लोभ, मत्सर, ईर्षा, अपमान, क्षुधा, तृषा, आधि, व्याधि, जन्म, जरा आणि मृत्यु इत्यादि दुसरेहि पुष्कळ उपसर्ग आहेत ॥ २७ ॥ एखादे वेळीं देवाची मायाच अशा स्त्रीनें आपल्या बाहुलतांनीं ह्याला आलिंगन दिलें असतां. याचें विवेकज्ञान नष्ट होऊन, तिला क्रीडेसाठीं घर बांधून देण्याच्या खटपटींत ह्याचें मन अगदीं गुंतून जातें. मग तिच्या संबंधापासून प्राप्त झालेले पुत्र, कन्या व स्वतः ती स्त्री ह्यांचें भाषण, अवलोकन व विलास ह्यांच्या योगानें त्याचें हृदय आकर्षित होतें व त्यामुळें त्याचें मनावरील नियंत्रण नष्ट होऊन हा जीवसमूह, स्वतःला अपार अशा

अंधतम नरकामध्यें पाडतो ॥ २८ ॥ परमाणूपासून दोन परार्धपर्यंत ज्याचें परिमाण आहे, तें षड्गुणैश्वर्यसंपन्न भगवान् विष्णूचें कालचक्र, आपल्या शीघ्रगतीनें बाल्यतारुण्यादिरूप वयाच्या स्वरूपानें क्षणमात्रांत ब्रह्मदेवापासून तों तृणस्तंबापर्यंत सर्व प्राणिमात्रांच्या देखत संहार करीत असतें. त्या चक्रापासून त्याच्या हृदयाला भीति उत्पन्न होते. तरी देखील तो जीव, कालचक्र हें ज्याचें स्वकीय आयुध अशा त्या प्रत्यक्ष यज्ञपुरुषरूपी परमेश्वराचा अनादर करून, केवळ संकेतानें ठरविलेल्या पण वस्तुतः निराधार अशा पाखंडमार्गांत शिरतो आणि आर्यधर्मांत ज्याचें नांव देखील नाहीं अशा कंक, पक्षी, गिधाड, बगळे व वटवाघूळ यांच्यासारख्या पाखंडदेवतांचा स्वीकार करितो ॥ २९ ॥ नंतर आपण ठरविलें तितकें द्रव्य न दिल्यामुळें फसलेल्या त्या पाखंड्यांनीं याला पक्कें फसविलें म्हणजे मग त्यांच्या मेळ्यांतून निघून हा ब्राह्मणसमूहांत राहूं लागतो; परंतु उपनयादिपूर्वक श्रौतस्मार्तकर्मानुष्ठानानें भगवान् यज्ञपुरुषाचें आराधन करण्याचें शील याला आवडत नाहींसें झालें म्हणजे पुढें हा त्यांना सोडून वेदोक्तकर्माविषयीं अनधिकारी असल्यामुळें वानरजातीप्रमाणें केवळ कुटुंबपोषण व स्त्रीसमागम हाच ज्याचा व्यापार आहे, अशा शूद्रकुळामध्यें शिरतो ॥ ३० ॥ या शूद्रजातीमध्येंहि प्रतिबंधरहित यथेच्छपणें क्रीडा करीत असतां ह्याची बुद्धि विषयांवरील आसक्तीमुळें अतिक्षुद्र होते व हा परस्परांचें मुखदर्शन आदिकरून क्षुद्र विषयोपभोगांत गुंग होऊन जातो आणि आपला मरणकाळ जवळ आला आहे हेंहि विसरून जातो ॥ ३१ ॥ कधींकधीं वृक्षांप्रमाणें इहलोकीं उपयोगीं पडणाऱ्या व खाणेंपिणें वगैरे विषयांनीं युक्त असलेल्या गृहामध्यें रममाण होणारा हा जीवसमूह, वानराप्रमाणें मैथुनाविषयीं उत्सुकता धारण करून आपल्या स्त्रीपुत्रादिकांवर प्रीति करूं लागतो ॥ ३२ ॥ याप्रमाणें या संसारमार्गांत सुखदुःखांचा अनुभव घेणारा हा जीवसमूह एखाद्या पर्वताच्या गुहेसारख्या भयंकर रोगादि संकटांमध्यें पडून मृत्युरूप हत्तीच्या भयानें विव्हळ होतो ॥ ३३ ॥ केव्हां तरी थंडीवारा इत्यादिकांपासून उत्पन्न झालेल्या अनेक प्रकारच्या आधिदैविक, आधिभौतिक व आध्यात्मिक अशा दुःखांच्या निवारणाविषयीं असमर्थ होऊन तो दुरंत चिंतेनें व्याकुळें होऊन राहतो ॥ ३४ ॥ एखादे वेळीं परस्परांशीं व्यवहार करितां करितां दुसऱ्याला फसवून थोडेसें धन मिळवितो ॥ ३५ ॥ केव्हां तरी जवळचें द्रव्य अगदीं संपून गेल्यामुळें शय्या, आसन, भोजन इत्यादि उपभोग त्याला मिळत नाहींसे होतात. मनांत पाहिजे असलेल्या या वस्तु भीक मागूनहि मिळत नाहींशा झाल्या म्हणजे त्या तो अन्यायानें मिळविण्याचा निश्चय करतो व त्याप्रमाणें वागूं लागला म्हणजे अपमान, निंदा व ताडण हीं त्यास लोकांपासून प्राप्त होतात ॥ ३६ ॥ याप्रमाणें द्रव्यासंबंधानें त्याचा परस्परांमध्यें गैरसंबंध वाढत चालला असतांहि तो पुनः प्रारब्धवशेंकरून परस्परांमध्यें विवाहादि संबंध करितो आणि पुनः वैर वाढूं लागलें म्हणजे लोकांचा त्यागहि करतो ॥ ३७ ॥ एकंदरींत अशा रीतीनें या संसारमार्गामध्यें अनेक प्रकारच्या क्लेशांनीं व उपसर्गांनीं तो पीडित होतो. अशा प्रकारें जो जेथें संकटांत पडेल किंवा मरण पावेल, त्याला त्याचा दुसरा सोबती तेथेंच टाकून नव्यानव्या झालेल्या पुत्रादिकांचा मात्र स्वीकार करतो,

शोक करीत, मोह पावत, भय पावत, विवाद करीत, आक्रोश करीत, हर्ष पावत व गायन करीत, भगवंताच्या मायेनें बद्ध होऊन, कालक्रमणा करीत असतो; पण ज्यापासून हा मनुष्यलोकांचा समुदाय मूळ निघाला आणि ज्याला संसाराचें समाप्तिस्थान असें म्हणतात, त्या परमेश्वराजवळ अद्यापि एका भगवद्भक्तावांचून दुसरा कोणताहि जीव परत येत नाहीं ॥ ३८ ॥ कारण ज्यांनीं प्राण्यांचा द्रोह सोडून दिला आहे, ज्यांचे स्वभाव शांत आहेत व ज्यांचीं मनें विषयांपासून निवृत्त झालीं आहेत, अशा मुनींनाच तो प्रसिद्ध असा भक्तियोग अनायासानें प्राप्त होतो, संसारमार्गात फिरणारे जे जीव त्यांना तो साधत नाहीं ॥ ३९ ॥ हे राजा, जे दिग्गजांना जिंकणारे व यज्ञयागादिक अनुष्ठानें करणारे असे राजर्षि आहेत त्यांनाहि तो भक्तियोग प्राप्त होत नाहीं. ते सुद्धां माझी ही भूमि आहे, तुझी नव्हे, असें म्हणून ह्या भूमिनिमित्त परस्पर वैरसंबंध करितात व शेवटीं युद्धामध्यें परस्परांकडून प्रहार पावून मरून जातात ॥ ४० ॥ या जीवसमूहानें केव्हां कांहीं चांगलीं कर्में केलीं असलीं, तर त्या पुण्यरूप वेलीचा आश्रय केल्यामुळें त्या रोगादि दुःखापासून अथवा नरकापासून तो कसाबसा सुटतो; परंतु पुनरपि तो वृत्तिमार्गांतच संचार करीत असल्यामुळें मनुष्यलोकाच्या मेळ्यांतच पुनः जाऊन मिळतो. मोठ्या पुण्यामुळें तो देवलोकीं गेला तरीहि तेथून पुनः मनुष्यलोकांत येऊन पडतो ॥ ४१ ॥ शुकाचार्य म्हणतात,—असें हें भवाटवीचें वर्णन भरतानें केलें आहे. हे राजा, पूर्वीचे मोठमोठे शिष्टहि त्या भरताचें माहात्म्य गायन करितात तें असें; जशी मक्षिका गरुडाच्या मार्गानें गमन करण्यास समर्थ होत नाहीं, त्याप्रमाणें महात्म्या राजर्षि ऋषभपुत्र भरताच्या मार्गाचें मनानेंहि अनुकरण करण्यास या लोकीं कोणताहि राजा समर्थ होणार नाहीं ॥ ४२ ॥ कारण पुण्यकीर्ति भगवंताच्या ठिकाणीं प्रीति असलेल्या त्या ऋषभपुत्र भरतानें मनोहर व त्याग करण्यास अशक्य अशा आपल्या पुत्र, कलत्र, सुहृद् आणि राज्य ह्यांचा तरुणपणींच विष्ठेप्रमाणें त्याग केला ॥ ४३ ॥ टाकण्यास अशक्य अशी पृथिवी, पुत्र, स्वजन, द्रव्य, स्त्रिया आणि देवश्रेष्ठांनींहि प्रार्थना करण्यास योग्य व भरताची दया आपणांवर होवो असें इच्छिणारी लक्ष्मी, यांची इच्छा भरतानें मुळींच धरली नाहीं, हें सगळें त्याला योग्यच आहे; कारण मधुसूदन भगवंताची सेवा करण्यांत ज्यांचीं अन्तःकरणें आसक्त असतात त्या थोर पुरुषांना मोक्षसुद्धां तुच्छ वाटतो ॥ ४४ ॥ यज्ञस्वरूपी, धर्माचा फलदाता कर्मानुष्ठानांत निपुणतेनें युक्त, अष्टाङ्गयोगानें प्राप्य, सांख्यशास्त्रानें प्रतिपाद्य, मायेचा नियंता व सर्व जीवांचा आधार, अशा हरीला नमस्कार असो, असे शब्द त्यानें हरिणदेहाचा त्याग करीत

असतांहि उच्चस्वरानें स्पष्ट उच्चारिले ॥ ४५ ॥ हे राजा, भगवद्भक्तांनीं आदरपूर्वक ज्याचे पवित्र गुण व चरित्र वर्णन केलीं आहेत, त्या राजर्षि भरताच्या कल्याणकारक, आयुष्यवर्धक, धन्यतासंपादक, कीर्तिप्रद आणि स्वर्ग व मोक्ष मिळवून देणाऱ्या ह्या चरित्राचें जो मनुष्य वारंवार श्रवण करितो, व्याख्यान करितो किंवा त्याचें स्तवन करितो, त्याचे सर्व मनोरथ स्वतःपासूनच परिपूर्ण होतात. तो दुसऱ्यापासून कसलीहि अपेक्षा करीत नाहीं ॥ ४६ ॥

**चौदावा अध्याय समाप्त**

---

# अध्याय १५ वा

श्रीशुकाचार्य म्हणाले,— हे राजा, भरताचा सुमतिनामक पुत्र होता. तो ऋषभदेवाच्या अवधूतमार्गानें जाऊन जीवन्मुक्त झाला. त्याच्या या वर्तनावरून कलियुगामध्यें कित्येक क्षुद्रबुद्धीचे पाखंडी लोक, आपल्या स्वतःच्या पापी बुद्धीला अनुसरून सुमतीला व वेदाला अमान्य अशा बुद्धदेवाचा अवतार मानितील ॥ १ ॥ त्या सुमतीला वृद्धसेनानामक स्त्रीपासून देवताजित नांवाचा पुत्र झाला ॥ २ ॥ तसाच त्या सुमतीपासून दुसऱ्या आसुरी नामक स्त्रीच्या पोटीं देवद्युम्न पुत्र झाला. त्या देवद्युम्नाला धेनुमतीच्यापासून परमेष्ठी नांवाचा पुत्र झाला व परमेष्ठीला सुवर्चला नांवाच्या स्त्रीच्या पोटीं प्रतीह झाला ॥ ३ ॥ तो प्रतीह पुष्कळ लोकांना आत्मज्ञानाचा उपदेश करून त्याच्यायोगानें स्वतः अत्यंत शुद्ध झाला आणि महापुरुष भगवंताचा साक्षात् अनुभव घेऊं लागला ॥ ४ ॥ नंतर त्या प्रतीहापासून सुवर्चलेच्या उदरीं, प्रतिहर्ता, प्रस्तोता आणि उद्गाता हे यज्ञकर्मामध्यें निपुण असे तीन पुत्र झाले. प्रतिहर्त्याला स्तुतीपासून अज आणि भूमा, असे दोन पुत्र झाले ॥ ५ ॥ भूम्यापासून ऋषिकुल्येच्या पोटीं उद्गीथ, उद्गीथापासून देवकुल्येच्या उदरीं प्रस्ताव आणि प्रस्तावापासून नियुत्सेच्या ठिकाणीं विभु अशी संतति झाली. विभूला रतीपासून पृथुषेण व पृथुषेणाला आकूतीपासून नक्त झाला. नक्ताला द्रुतिनामक भार्येच्या उदरीं गयनांवाचा पुत्र झाला. तो अत्युत्तम कीर्तिमान् असा राजर्षिश्रेष्ठ होता. तो जगत्संरक्षण करण्याच्या इच्छेनें सत्त्वगुण धारण करणाऱ्या प्रत्यक्ष भगवान् विष्णूचा अंश असून ज्ञानाचीं उत्तम लक्षणें त्याच्यांत असल्यामुळें सर्व लोकांत तो श्रेष्ठता पावला ॥६॥ प्रजांचें पालन, पोषण, संतोष, उपलालन व योग्य शिक्षण या लक्षणांनीं युक्त असलेल्या आणि ब्रह्मादिकांपेक्षांहि श्रेष्ठ अशा षड्गुणैश्वर्यसंपन्न महापुरुष परब्रह्माच्या ठिकाणीं सर्वात्मभावानें यज्ञयागादिकांचें अर्पण केलें असतां परम पुरुषार्थाचें साधन होणाऱ्या अशा आपल्या स्वधर्माच्या योगानें, तसाच ब्रह्मज्ञानी पुरुषांच्या निरंतर चरणसेवेनें व संपादन केलेल्या भगवद्भक्तीच्या योगानें त्याची बुद्धि संस्कारयुक्त व शुद्ध झाली व त्यामुळें देहादिकाविषयींचा त्याचा अहंभाव नाहींसा होऊन त्याला अन्तःकरणामध्यें स्वतःच ब्रह्मानुभव मिळूं लागला. तथापि अभिमान सुटला असतांहि तो गयराजा, लोकसंग्रहाकरितां पृथ्वीचें रक्षण करीत होताच ॥ ७ ॥ हे पांडुकुलोत्पन्ना परीक्षित्राजा, प्राचीन इतिहासाचे ज्ञाते त्या गयराजाची स्तुति गातात कीं, ॥ ८ ॥ “ अहो दुसरा कोणता राजा कर्मांनीं गयराजाचें अनुकरण करणारा आहे ?” विधिपूर्वक यज्ञादि कर्मे करणारा, सर्व प्रकारें सन्मानास्पद, बहुज्ञानी, धर्मरक्षण करणारा, संपत्तिमान्, साधूंच्या सभेचा अधिपति आणि सज्जनांची सेवा करणारा असा एक भगवदंशरूप गयराजाखेरीज दुसरा कोण आहे ? ॥९॥ ज्यांचे आशीर्वाद सत्य आहेत अशा श्रद्धा, मैत्री, दया इत्यादि पतिव्रता दक्षकन्यांनीं त्याला मोठ्या आनंदानें गंगादि नद्यांच्या

उदकांनीं अभिषेक केला. तो निरिच्छ असतांहि त्याच्या गुणांविषयींच्या प्रेमामुळें पृथ्वीला पान्हा फुटला व तिनें प्रजाजनांचे सर्व मनोरथ पूर्ण केले ॥ १० ॥ तो निष्काम असतांहि त्याच्या कामना वेदांनीं वेदोक्त कर्मांनीं परिपूर्ण केल्या होत्या. युद्धामध्यें बाणाच्या योगानें तो ज्याची पूजा करी ते राजे त्याला करभार अर्पण करीत. तो ब्राह्मणांचें रक्षण करून त्यांना दक्षिणादिकांनीं तृप्त करी व ते त्याला परलोकीं प्राप्त होणाऱ्या धर्मफलांचा सहावा भाग अर्पण करीत ॥ ११ ॥ पुष्कळ सोमपान मिळाल्यामुळें त्याच्या यज्ञामध्यें इंद्र मदांध होत असे. श्रद्धेनें व अत्यंत शुद्ध आणि निश्चल यज्ञस्वरूपी भगवंतानें भक्तियोगानें अर्पण केलेलें यज्ञाचें फल, तो प्रत्यक्ष स्वीकारीत असे ॥ १२ ॥ ज्या भगवंताच्या संतोषानें ब्रह्मदेवापासून देव, पशुपक्षी, मनुष्य, फार काय पण वेली, गवत सुद्धां सर्व सृष्टि तृप्त होते, तो जगाचा जीव भगवान् तृप्त होऊन गयराजाच्या यज्ञामध्यें आनंदित झाला ॥ १३ ॥ पुढें गयराजाला गयंतीपासून चित्ररथ, सुगति आणि अवरोधन असे तीन पुत्र झाले. चित्ररथाला ऊर्णेच्या पोटीं सम्राट् या नांवाचा पुत्र झाला ॥ १४ ॥ त्या सम्राटाला उत्कलेच्या ठिकाणीं मरीचि झाला. मरीचीपासून बिंदुमतीच्या उदरीं बिंदुमान झाला. त्याच्यापासून सरघेला मधु नांवाचा पुत्र झाला. मधूपासून सुमनेच्या ठिकाणीं वीरव्रत झाला. त्यापासून भोजेच्या पोटीं मंथु आणि प्रमंथु असे दोन पुत्र झाले. मंथूला सत्येपासून भौवन झाला व भौवनाला दूषणेच्या उदरीं त्वष्टा झाला. त्वष्ट्याला विरोचनेच्या उदरीं विरज झाला आणि विरजाला विषुचीच्या ठिकाणीं शतजित्प्रमुख शंभर पुत्र व एक कन्या अशीं मुलें झालीं. ॥ १५ ॥ त्याविषयीं श्लोक आहे तो असा :—“ जसा विष्णु देवगणाला शोभा देतो त्याप्रमाणें प्रियव्रतराजाच्या वंशांत शेवटीं उत्पन्न झालेल्या विरजानें आपल्या कीर्तीनें त्या वंशाला अत्यंत अलंकृत केलें.” ॥ १६ ॥

**पंधरावा अध्याय समाप्त**

# अध्याय १६ वा

राजा म्हणाला,—हे मुने, जितक्या लांबपर्यंत सूर्य प्रकाशमान होतो व जेथें अस्त पावतो, तसेंच जेथें चंद्र ज्योतिर्गणासह दिसतो, तितका पृथ्वीमंडळाच्या लांबीरुंदीचा प्रदेश तूं मला सांगितलास ॥ १ ॥ हे भगवन्, त्यामध्येंहि प्रियव्रतराजाच्या रथाच्या चाकांनीं पडलेल्या सात खड्डयांच्या योगानें सात समुद्र होऊन त्यांच्या योगानें त्या पृथ्वीच्या सात निरनिराळ्या द्वीपांची रचना झाली असेंहि तूं सामान्यतः सुचविलेंस. आतां त्या सर्वांचीं लांबीरुंदीचीं प्रमाणें व लक्षणें जाणण्याची मला इच्छा आहे ॥ २ ॥ कारण, हें सर्व भगवंताचें सगुण असें विराट्स्वरूप आहे व त्या ठिकाणीं मन स्थिर केलें असतां निर्गुण, अतिसूक्ष्म, स्वप्रकाश व परब्रह्मरूप अशा भगवान् वासुदेवाच्या ठिकाणीं सुद्धां तें स्थिर होण्यास योग्य होतें. यास्तव, हे गुरो, भगवंताचें हें ब्रह्मांडात्मक स्थूल स्वरूप मला आपण कृपा करून सांगावें ॥ ३ ॥

श्रीशुकाचार्य म्हणाले, — हे राजा, देवांचें आयुष्य प्राप्त झालें तरीही भगवन्मायेच्या गुणविस्ताराचा अंत, मनानें जाणण्याची, वाचेनें वर्णन करण्याची शक्ति मनुष्याला नाहीं. यास्तव भूगोलाच्या रचनेपैकीं मुख्य गोष्टींचींच नांवें, रूपें, लांबी, रुंदी व लक्षणें सांगून मी वर्णन करितों ॥ ४ ॥ हे राजा, आपण ज्यांत सांप्रत आहों, तें हें द्वीप, भूमंडळरूप कमळाच्या पाकळ्याच्या घेरांतील पेल्यासारखें असून ह्याचें क्षेत्रफळ लक्ष योजनें आहे व त्याचा आकार कमळाच्या पानांसारखा समवर्तुळ आहे ॥ ५ ॥ त्यामध्यें नऊ नऊ हजार योजनें विस्तीर्ण अशीं नऊ खंडें असून तीं मध्यें असलेल्या मर्यादादर्शक आठ पर्वतांनीं एकमेकांपासून विभक्त झालेलीं आहेत ॥ ६ ॥ या नऊ खंडांमध्यें इलावृत नांवाचें खंड सर्वांच्या मध्यभागीं असून त्याच्यामध्यें कुल पर्वतामधील मुख्य असा मेरुपर्वत आहे. तो भूमंडळरूप कमळाचा पेलाच असून जंबुद्वीपाच्या विस्ताराइतकाच म्हणजे एक लक्ष योजनें उंच आणि मुळापासून शिखरापर्यंत सगळा सुवर्णमय आहे. तो मस्तकाजवळ बत्तीस हजार योजनें विस्तीर्ण असून, मुळाशीं सोळा हजार योजनें आहे व तितकाच सोळा हजार योजनें भूमीमध्यें शिरलेला आहे. मिळून तो भूमींत सोळा हजार योजनें व भूमीवर चौऱ्याऐशीं हजार योजनें असा एक लक्ष योजनें आहे ॥ ७ ॥ इलावृतखंडाच्या उत्तरेकडे नीळ, श्वेत आणि शृंगवान् असे तीन पर्वत असून ते अनुक्रमानें रम्यक, हिरण्मय आणि कुरु या खंडांच्या मर्यादा दर्शविणारे आहेत. ते पूर्वपश्चिम लांब असून दोहों बाजूंनीं खाऱ्या पाण्याच्या समुद्राला मिळालेले आहेत. त्यांची रुंदी दोन दोन हजार योजनें असून उत्तरेकडचा प्रत्येक पर्वत पूर्वींच्यापेक्षां दशांशाहून कांहीं अधिक इतका लांबीनें मात्र कमी आहे. उंची व रुंदी सगळ्यांची सारखीच आहे ॥ ८ ॥ ज्याप्रमाणें इलावृताच्या उत्तरेकडे नीलादिक पर्वत आहेत त्याप्रमाणेंच दक्षिणेकडेहि निषध, हेमकूट आणि हिमालय

असे तीन पर्वत दहा दहा हजार योजनें उंचीचे, दोन दोन हजार योजनें रुंदीचे व पूर्वपश्चिम समुद्रापर्यंत लांबीचे असून ते हरिवर्ष, किंपुरुष आणि भारत या खंडांच्या मर्यादा दाखविणारे आहेत ॥ ९ ॥ तसेंच इलावृताच्या पश्चिमेकडे व पूर्वेकडे माल्यवान् आणि गंधमादन असे दोन पर्वत, उत्तरेकडे नील पर्वतापर्यंत व दक्षिणेकडे निषध पर्वतापर्यंत लांबीचे, दोन हजार योजनें रुंदीचे व दहा हजार योजनें उंचीचे असून ते अनुक्रमानें केतुमाल आणि भद्राश्व या खंडांच्या सीमा दाखवितात ॥ १० ॥ तसेच मेरुपर्वताच्या पूर्वादिक चारी दिशांकडे मंदर, मेरुमंदर, सुपार्श्व आणि कुमुद हे मेरुपर्वताचे आधारभूत असे चार सुवर्णमय पर्वत दहा हजार योजनें विस्ताराचे व उंचीचे परमेश्वरानें रचिलेले आहेत ॥ ११ ॥ या चार पर्वतांवर अनुक्रमानें एकावर एक असे आंबा, जांभूळ, कळंब आणि वड हे चार प्रचंड वृक्ष आहेत. ते पर्वतांचे जणूं काय ध्वजच आहेत. त्यांचा विस्तार अकराशें योजनें उंच असून तितकाच त्यांच्या शाखांचा पसारा आहे व त्यांच्या अंगांचे घेर शंभर शंभर योजनें आहेत ॥ १२ ॥ तसेंच ह्या चार पर्वतांवर अनुक्रमानें दूध, मध, उसाचा रस आणि स्वच्छ उदक ह्यांनीं भरलेले चार डोह आहेत. त्यांतील दुग्धादिकांचें सेवन करणाऱ्या सिद्धकिन्नरप्रभृति उपदेवांच्या गणांना प्रयत्नावांचूनच अणिमादिक योगैश्वर्यें प्राप्त होतात ॥ १३ ॥ तशींच त्या चार पर्वतांवर, अनुक्रमानें नंदन, चैत्ररथ, वैभ्राजक आणि सर्वतोभद्र ह्या नांवांचीं चार उपवनें आहेत ॥ १४ ॥ ह्या उपवनांमध्यें सुंदर देवांगनांचा समुदाय आपल्या पतींसह यथेच्छ क्रीडा करितो व त्या वेळीं उपदेवगण त्यांचा पराक्रम गात असतात ॥ १५ ॥ मंदर पर्वतावर अकराशें योजनें उंच असलेल्या आम्रवृक्षाच्या शेंड्यावरून पर्वताच्या शिखरासारखे मोठे व अमृतासारखे गोड आंबे खालीं पडतात ॥ १६ ॥ त्या अति उंचावरून पडून फुटणाऱ्या आंब्यांचा अतिमधुर, सुवासयुक्त अशा तांबड्या विपुल रसाच्या प्रवाहानें झालेली अरुणोदा नांवाची नदी, मंदरपर्वताच्या शिखरावरून खालीं पडत इलावृत खंडाच्या पूर्वभागाला भिजवून टाकित्ये ॥ १७ ॥ भवानीदेवीची सेवा करणाऱ्या यक्षस्त्रियांच्या अवयवांना स्पर्श केल्यामुळें सुगंधयुक्त झालेला वारा या आम्ररसाचें सेवन करीत असल्यामुळें आसपासच्या प्रदेशाला दहा योजनेंपर्यंत सुगंधयुक्त करितो ॥ १८ ॥ याप्रमाणें हत्तीच्या अंगाएवढाल्या व अतिसूक्ष्म बीजानें युक्त अशा आणि फार उंचावरून पडल्यामुळें फुटलेल्या जांभळीच्या फळांच्या रसानें उत्पन्न झालेली जंबू नांवाची नदी, दहा हजार योजनें उंच असलेल्या मेरुमंदरनामक पर्वताच्या शिखरावरून भूतलावर पडून आपल्या दक्षिणेकडील सर्व इलावृत खंडाला व्यापून वाहते ॥ १९ ॥ त्या नदीच्या दोन्ही तीरांवरील मृत्तिका तींतील जांभळीच्या रसानें भिजत्ये आणि मग वायूच्या व सूर्यकिरणांच्या संयोगानें वाळून गेली म्हणजे तिचें सोनें होतें व त्याचीं लोक भूषणें करितात ॥ २० ॥ तें सुवर्ण देवगंधर्वादिक आपल्या तरुण स्त्रियांसह मुकुट, कडीं, कटिसूत्रें इत्यादि भूषणांच्या रूपानें खरोखर धारण करितात ॥ २१ ॥ आतां सुपार्श्वल पर्वतावर उगवलेला जो मोठा कळंबवृक्ष आहे, त्याच्या ढोलींतून पांच वांवांएवढाल्या स्थूळ अशा पांच मधाच्या धारा बाहेर निघतात. त्या सुपार्श्व पर्वताच्या

शिखरावरून खालीं पडत असून आपल्या पश्चिमेकडील सर्व इलावृतखंडाला आनंदित करितात ॥ २२ ॥ त्या मधुधारांचें सेवन करणाऱ्या प्राण्यांच्या मुखांतून निघालेला वारा आसपासच्या प्रदेशाला शंभर योजनेंपर्यंत सुगंधयुक्त करितो ॥ २३ ॥ याप्रमाणें कुमुदपर्वतावर उगवलेला जो शतवल्श नांवाचा वटवृक्ष आहे त्याच्या स्कंधापासून खालीं मुख करून दूध, दहीं, मध, घृत, गूळ, अन्न, वस्त्रें, शय्या, आसनें, अलंकार इत्यादिकांचे प्रवाहरूप पुष्कळ नद निघतात; ते सर्वहि इच्छित मनकामना पूर्ण करणारे असून कुमुद-पर्वताच्या शिखरावरून खालीं पडत आपल्या उत्तरेकडील इलावृतखंडामध्यें वाहत असतात ॥ २४ ॥ त्या नदाच्या दुग्धादिरसांचा उपभोग घेणाऱ्या प्रजांना अंगावर सुरकुत्या पडणें, केंस पांढरे होणें, ग्लानि, घाम, दुर्गंधि, जरा, रोग, अपमृत्यु, थंडी, उष्णता, पिवटपणा इत्यादि अनेक प्रकारचे ताप कधींच होत नाहींत. त्यांना जन्मभर अत्यंत सुखच प्राप्त होतें ॥ २५ ॥ हे राजा, कुरंग, कुरर, कुसुंभ वैकंक, त्रिकूट, शिशिर, पतंग, रुचक, निषध, शिनी, वास, कपिल, शंख, वैदूर्य, जारुधि, हंस, ऋषभ, नाग, कालंजर, नारद इत्यादि हे वीस पर्वत, जसे कमलांतील पेल्याच्या सभोंवतीं केसर असतात तसे, मेरुपर्वताच्या पायथ्याभोंवतीं ईश्वरानें निर्माण केलेले आहेत ॥ २६ ॥ मेरुपर्वताच्या पूर्वेकडे दक्षिणोत्तर अठरा हजार योजनें लांब व दोन दोन हजार योजनें रुंद व तितकेच उंच असे जठर व देवकूट या नांवांचे दोन पर्वत आहेत. त्याचप्रमाणें मेरूच्या पश्चिमेकडे दक्षिणोत्तर लांबीचे पवन आणि पारियात्र या नांवाचे दोन पर्वत आहेत. तसेंच दक्षिणेकडे पूर्वपश्चिम पसरलेले कैलास आणि करवीर पर्वत व उत्तरेकडे पूर्वपश्चिम लांबीचे त्रिशृंग आणि मकर हे दोन पर्वत आहेत. या आठ पर्वतांमुळें सभोंवतीं परिस्तरणें घातलेल्या अग्नीप्रमाणें मेरुपर्वत शोभत आहे ॥ २७ ॥ मेरुपर्वताच्या माथ्यावर मध्यभागीं निर्माण केलेली दहा हजार योजनें लांबीरुंदीची, समचतुष्कोण अशी भगवान् ब्रह्मदेवाची सुवर्णाची नगरी आहे. तिला शातकौम्भी असें म्हणतात ॥ २८ ॥ त्या ब्रह्मपुरीच्या सभोंवतीं पूर्वादिक दिशांना इंद्र आदिकरून आठ लोकपालांच्या आठ नगरी, त्या त्या लोकपालांच्या वर्णाप्रमाणें असून, त्या ब्रह्मदेवाच्या नगरीच्या चतुर्थांश मानानें म्हणजे अडीच हजार योजनें विस्ताराच्या अशा रचिलेल्या आहेत ॥ २९ ॥

## सोळावा अध्याय समाप्त

# अध्याय १७ वा

शुकाचार्य म्हणाले,—हे राजा, जेव्हां बलिराजाच्या यज्ञांत त्रिविक्रमरूप धारण करणाऱ्या साक्षात् भगवान् श्रीविष्णूनें आपल्या उजव्या पायानें सर्व भूमंडळ आक्रमण करून डाव्या पायानें वरचे स्वर्गादिक सर्व लोक व्यापिले, तेव्हां त्याच्या डाव्या पायाच्या नखानें ब्रह्मांडकटाहाची वरची कवची फुटली व ब्रह्मांडाच्या बाहेर असलेल्या आवरणोदकाची धारा त्या छिद्रानें आंत प्रविष्ट झाली. त्या धारेनें भगवंताच्या चरणकमलाचें क्षालन केल्यामुळें त्यावरील केशराच्या परागानें ती आरक्तवर्ण झाली व केवळ आपल्या स्पर्शमात्रानें सर्व जगाचा पापरूप मळ हरण करूं लागली; परंतु स्वतः मात्र ती त्या पापसंपर्कापासून अलिप्त राहिली. त्या वेळीं तिला जान्हवी, भागीरथी इत्यादि दुसरीं नांवें नव्हतीं. भगवत्पदी हें एकच नांव तिला होतें. ती पुढें सहस्र युगांनीं योजिल्या जाणाऱ्या अतिमोठ्या काळानें स्वर्गाच्या मस्तकावर उतरली. हें स्वर्गाचें मस्तक म्हणजे ज्याला विष्णुपद असें म्हणतात तें होय ॥ १ ॥ त्या विष्णुपदावर दृढ संकल्प असणारा महाभगवद्भक्त उत्तानपादराजाचा पुत्र ध्रुव राहतो. तो त्या विष्णुपदाला पाहून आमची कुलदेवता जो श्रीहरि त्याच्या चरणकमलापासून निघालेलें हें उदक आहे असें म्हणतो व त्या विचारानें प्रतिक्षणीं त्याची भगवद्भक्ति वृद्धिंगत होऊन त्याचें हृदय अगदीं द्रवून जातें. मग उत्कंठेमुळें परवश झाल्यासारखा होऊन आपले दोन्ही नेत्र मिटतो. त्या वेळीं कमळाच्या कळ्यांतून पाणी गळावें त्याप्रमाणें त्याच्या त्या नेत्रांतून अश्रुधारा वाहूं लागून अंगावर रोमांच उभे राहतात व अजूनहि नित्य त्या गंगेला तो परमादरपूर्वक आपल्या मस्तकीं धारण करितो ॥ २ ॥ तसेंच त्या ध्रुवपदाच्या खालीं राहाणारे व त्या गंगेचा प्रभाव जाणणारे सप्तऋषिहि, आपल्या तपाची सर्वोत्कृष्ट सिद्धि म्हणजे भगवंताच्या चरणोदकाची प्राप्तिच होय, असा निश्चय करून षड्गुणैश्वर्यसंपन्न व सर्वांचा आत्मा असा जो वासुदेव त्याच्या ठिकाणीं निश्चळ भक्तियोगाचा लाभ झाल्यामुळें धर्मादिक इतर पुरुषार्थांची व आत्मज्ञानाची उपेक्षा करितात आणि मुमुक्षु जन, जसे आपण होऊन प्राप्त झालेल्या मुक्तीचा बहुमानपूर्वक स्वीकार करितात त्याप्रमाणें त्या गंगेला अजूनहि आपल्या जटाजूटांनीं बहुमानपूर्वक धारण करितात; ॥ ३ ॥ त्या सप्तऋषींच्या स्थानापासून हजारों कोटि विमानांच्या समूहांनीं व्याप्त झालेल्या आकाशमार्गानें उतरणारी ती गंगा, चंद्रमंडळाला भिजवून मेरुपर्वताच्या शिखरावर असलेल्या ब्रह्मसदनांत पडते ॥ ४ ॥ त्या ठिकाणीं तिचे चार निरनिराळे प्रवाह होऊन त्यांना सीता, अलकनंदा, चक्षु आणि भद्रा हीं नांवें प्राप्त होतात. अशी ती गंगा पूर्वादि चारहि दिशांकडे जाऊन, नद व नद्या यांचा पति जो समुद्र त्यांच्यांत शेवटीं प्रवेश करित्ये ॥ ५ ॥ त्यांपैकीं सीता तर त्या ब्रह्मसदनापासून मेरु पर्वताच्या सभोंवतीं केसरासारखे दिसणारे कांहीं पर्वत आहेत त्यांच्या

व त्यांच्या पुढील दुसऱ्या पर्वतांच्या शिखरांवरून खालीं वाहत जातां जातां गंधमादनपर्वताच्या शिखरांवर पडते व पुढें भद्राश्व खंडामधून पूर्व दिशेकडे जाऊन खाऱ्या पाण्याच्या समुद्राला मिळते ॥ ६ ॥ त्याचप्रमाणें माल्यवान् पर्वताच्या शिखरावरून केतुमाल खंडामध्यें खालीं उतरणारी चक्षुनामक गंगा तीव्र वेगानें वाहत, पश्चिम दिशेकडे समुद्रांत प्रवेश करित्ये ॥ ७ ॥ तशीच मेरुपर्वताच्या शिखरावरून उत्तरेकडे पडणारी भद्रानामक गंगा, कुमुद पर्वताच्या शिखरावरून नील पर्वताच्या शिखरावर उतरते व तेथून श्वेत पर्वताच्या शिखरावर पडून मग त्यालाहि मागें टाकून शृंगवान् पर्वताच्या शिखरावरून खालीं उत्तरकुरुनामक खंडांतून वाहत जाऊन उत्तर दिशेकडे उत्तर समुद्रामध्यें प्रवेश करित्ये ॥ ८ ॥ चौथी अलकनंदा-नामक गंगा ब्रह्मसदनापासून दक्षिणेकडे पडत असतांना केसराचल, कैलास, निषध इत्यादि पर्वतांच्या शिखरांचें उल्लंघन करून हेमकूटपर्वतावर येते व तेथून अस्खलित अशा अतितीव्रवेगानें हिमालयाच्या शिखरांचें आक्रमण करून भरतखंडांत जाऊन दक्षिण दिशेकडे समुद्रामध्यें प्रवेश करित्ये. तिच्यामध्यें स्नान करण्याकरितां जाणाऱ्या पुरुषाला पदोपदीं अश्वमेध, राजसूय इत्यादि यज्ञांचें फळ सुलभतेनें मिळतें ॥ ९ ॥ तसेंच प्रत्येक खंडामध्यें दुसरेहि पुष्कळ नद व मेरु आदिकरून पर्वतांपासून उत्पन्न झालेल्या नद्याहि शेंकडों आहेत ॥ १० ॥ त्यांमध्यें भरतखंड हेंच कर्में आचरण करण्यास योग्य स्थळ असून इतर जीं आठ खंडें आहेत तीं स्वर्गवासी लोकांच्या अवशेष राहिलेल्या पुण्यफळांचा उपभोग घेण्याचीं स्थानें असल्यामुळें त्यांना भूमीवरील स्वर्गस्थानें असें म्हणतात ॥ ११ ॥ ह्या आठ खंडांमध्यें देवासारख्या निरोगी व तेजस्वी असणाऱ्या पुरुषांना, मनुष्यमानानें दहा हजार वर्षें आयुष्य असून दहा हजार हत्तींचें बळ असतें. तसेंच त्यांच्या वज्रासारख्या दृढ शरिरांत असलेली जी शक्ति, तारुण्य, वय व आनंदी स्वभाव, ह्यांच्या योगानें हर्षयुक्त झालेलीं तेथील दंपत्यें पुष्कळ काळपर्यंत सुरतक्रीडा करितात आणि शेवटीं त्या पुरुषांच्या आयुष्याचें एक वर्ष अवशेष राहिलें म्हणजे त्यांच्या स्त्रियांना एक वेळ गर्भसंभव होतो. अशा प्रकारें सुखोत्कर्ष असल्यामुळें तेथें निरंतर त्रेतायुगासारखा काळ राहतो ॥ १२ ॥ त्या आठहि खंडांमध्यें राहणाऱ्या देवांच्या अधिपतींची, त्यांच्या त्यांच्या आपापल्या सेवकजनांतील मुख्य मुख्य जण उत्तमोत्तम पूजा करितात आणि सर्व ऋतूंमध्यें आढळणाऱ्या पुष्पांचे गुच्छ, फळें व नूतन पल्लव यांच्या समृद्धीनें ज्यांच्या फांद्या व त्या फांद्यांवर चढलेल्या वेली लवल्या आहेत अशा वृक्षांनीं, ज्यांमध्यें सुंदर उपवनें शोभत आहेत अशा आश्रमस्थानामध्यें खंडांच्या मर्यादा दर्शविणाऱ्या पर्वतांच्या गुहांमध्यें, तसाच विकसित होणाऱ्या नाना जातींच्या नूतन कमळांच्या सुगंधानें आनंद पावलेले राजहंस, पाणकोंबडे, कारंडव, सारस व चक्रवाक इत्यादि पक्ष्यांनीं व भ्रमरसमूहांच्या भिन्न भिन्न जातींनीं नादयुक्त झालेल्या निर्मळ सरोवरांमध्यें अतिसुंदर अशा देवांगनांचे मदनानें शोभाविलेले जे विलास, हास्य व लीलाकटाक्ष त्यांच्या योगानें त्यांचीं मनें व दृष्टि आकर्षित होतात. अशा रीतीनें जलक्रीडादिक विचित्र विनोद करीत ते देव तेथें यथेच्छ क्रीडा करीत असतात ॥ १३ ॥ नऊहि खंडांमध्यें षड्गुणैश्वर्यसंपन्न

महापुरुष नारायण, तेथें राहणाऱ्या पुरुषांवर पुढें सांगितल्याप्रमाणें अनुग्रह करण्याकरितां आपल्या मूर्तींच्या समूहानें स्वतःचें रूप प्रगट करीत असतो ॥ १४ ॥ इलावृत खंडामध्यें तर भगवान् शंकर हा एकटाच पुरुष राहत असतो. कारण, तेथें पर्वतीच्या शापाचें कारण जाणणारा अलीकडचा दुसरा कोणीही पुरुष प्रवेश करीत नाहीं. त्या खंडामध्यें प्रवेश करणाऱ्या पुरुषाला स्त्रीचें स्वरूप प्राप्त होतें. पार्वतीनें दिलेल्या शापाचें कारण मी तुला पुढें सांगेन * ॥१५॥ त्या इलावृत खंडामध्यें ज्यांची धनीण पार्वती आहे अशा दहा कोट स्त्रिया शंकराची सर्व प्रकारें सेवा करितात. शंकर आपलें उत्पत्तिस्थान जो चतुर्व्यूहमूर्ति षड्गुणैश्वर्यसंपन्न महापुरुष नारायण, त्याची चौथी जी संकर्षणनामक तामसी मूर्ति, तिचें समाधियोगानें मनांत चिंतन करून पुढील अर्थाच्या मंत्राचा जप करीत त्या मूर्तीची स्तुति करितो ॥ १६ ॥

श्रीभगवान् महादेव म्हणतो—" जो स्वतः अव्यक्त आहे व ज्यापासून सर्व गुण प्रगट होतात, त्या षड्गुणैश्वर्यसंपन्न अविनाशी महापुरुषाला मी ॐकारपूर्वक वारंवार नमस्कार करितों ॥ १७ ॥ हे भजन करण्यास योग्य अशा परमेश्वरा, तुझें चरणकमल, भक्तांना संरक्षण करणारें आहे; तूं षड्गुणैश्वर्याचें परम स्थान असून भक्तांच्या ठिकाणीं आपलें स्वरूप तूं उत्कटपणें प्रगट केलें आहेस. तूं भक्तांना संसारांतून पार पाडणारा असून अभक्तांना संसारांत टाकणारा आहेस; मी तुझी उपासना करितों ॥ १८ ॥ हे देवा, क्रोधाचा वेग न जिंकणाऱ्या आमची दृष्टि, जशी विषयांच्या योगानें लिप्त होत्ये, तशी तुझी दृष्टि, पाहणाऱ्या अशा मायासंबंधीं विषयवासनायुक्त चित्तवृत्तींनीं किंचित्सुद्धां लिप्त होत नाहीं. यावरून कोणता बरें इंद्रियांचें दमन करण्यास इच्छिणारा पुरुष तुझा आदर करणार नाहीं ? ॥ १९ ॥ हे भगवन्, तूं पापदृष्टि पुरुषांना आपल्या मायेच्या योगानें मत्त असल्यासारखा आणि सुरा व तालादिकांचें आसव यांच्या सेवनानें तांबडे डोळे झाल्यासारखा भासतोस आणि तुझ्या चरणाच्या स्पर्शानें, ज्यांचीं मनें काममोहित झालीं आहेत, अशा नागपत्न्या लज्जित होऊन पुढें तुझ्या भुजादिकांचें पूजन करण्यास समर्थ होत नाहींत ॥ २० ॥ हे ईश्वरा, तूं जगाची उत्पत्ति, पालन व नाश यांचें कारण आहेस आणि तिन्ही गुणांनीं रहित असल्यामुळें अनंत आहेस, असें वेदमंत्र म्हणतात. तूं आपल्या सहस्रमस्तकरूप स्थानांपैकीं कोणत्या स्थानीं हें भूमंडळ मोहरीसारखें राहिलें आहे तें जाणत सुद्धां नाहींस; त्या अनंतरूपी तुला नमस्कार असो ॥ २१ ॥ तुझा पहिला गुणनिमित्तक अवतार म्हटला म्हणजे महत्तत्त्वनामक होय; त्याला सत्त्वगुणाचा आश्रय असल्यामुळें तोच चित्तरूपानें वासुदेवरूपी व ब्रह्मदेवरूपी झाला आहे; त्या ब्रह्मदेवापासून झालेला मी आपल्या त्रिगुणात्मक अहंकारमय तेजानें सात्त्विक, तामस व राजस असे देवतांचे, महाभूतांचे व इंद्रियांचे समूह उत्पन्न करितो ॥२२॥ आणि हें महत्तत्त्व, अहंकार

* ही कथा पुढें नवव्या स्कंधांत आली आहे.

व सत्त्वतमोरजात्मक देवादिसमूहरूप, आम्हीं सर्वजणहि सूत्रांनीं बांधून स्वाधीन करून ठेवलेल्या पक्ष्यांप्रमाणें तुज महात्म्या भगवंताच्या स्वाधीन राहून तुझ्या अनुग्रहामुळें हें जग उत्पन्न करितों ॥ २३ ॥ सत्त्वादिगुणांच्या उत्पत्तीमुळें, मोहित झाल्यामुळें, हे सर्व लोक, तूं निर्माण केलेल्या व त्यांची कर्मांशीं गांठ घालून देणाऱ्या मायेला मात्र अनायासानें जाणतो; परंतु तिला तरून जाण्याचा उपाय त्याला कधींहि जाणतां येत नाहीं. संहार व उत्पत्ति हीं तुझींच स्वरूपें होत. तुज भगवंताला माझा नमस्कार असो ॥ २४ ॥

**सतरावा अध्याय समाप्त**

---

# अध्याय १८ वा

श्रीशुकाचार्य म्हणाले,—हे राजा, तसेंच भद्राश्व खंडामध्यें त्या खंडाचा अधिपति धर्माचा पुत्र भद्रश्रवा आणि त्याचे मुख्य सेवक पुरुष हे राहतात. ते प्रत्यक्ष भगवान् वासुदेवाच्या हयग्रीवनामक धर्ममय प्रियमूर्तीचें उत्कृष्ट समाधीच्या योगानें चिंतन करून, पुढील मंत्राचा जप करीत तिची स्तुति करितात ॥ १ ॥

भद्रश्रवा आणि त्याचे सेवकगण म्हणतात,—" हे भगवन्, तूं अंतःकरणाची शुद्धि करणारा व धर्मरूपी आहेस. तुला ॐकारपूर्वक नमस्कार असो ॥ २ ॥ अहो! तुच्छ अशा विषयसुखांचा उपभोग घेण्याकरितां पापांचें चिंतन करणारे लोक मेलेल्या पुत्राला किंवा पित्याला जाळून त्याच्या द्रव्यानें आपला निर्वाह करून जिवंत राहण्याचीं इच्छा करितात; परंतु आपणालाहि मारणारा काळ अकस्मात् प्राप्त होईल असें पाहत असतांहि न पाहिल्यासारखें करतात, तेव्हां ही भगवंताची लीला मोठी आश्चर्यकारक आहे! ॥ ३ ॥ अहो, हें संपूर्ण जग नश्वर आहे, असे विवेकी पुरुष, शास्त्रानें व अनुभवानें जाणतात आणि अध्यात्मवेत्ते ज्ञानी, समाधीमध्यें प्रत्यक्ष पाहतात. तथापि हे जन्मरहित परमेश्वरा, तेच लोक तुझ्या मायेनें मोहित होतात. हें तुझें कृत्य अत्यंत आश्चर्यकारक आहे; म्हणून मी शास्त्रादिकांच्या श्रमाचा त्याग करून जन्मादि विकारशून्य अशा तुला केवळ नमस्कार करितों ॥ ४ ॥ हे परमेश्वरा, तूं अकर्ता व आवरणरहित आहेस. विश्वाची उत्पत्ति, स्थिति व लय हें तुझें कर्म वेदानें स्वीकारिलें आहे तें योग्यच आहे. कारण, तूं मायेमुळें सर्वांचा आत्मा व सर्व कार्यांचा उत्पादक असून वस्तुतः उपाधिरहित आहेस ॥ ५ ॥ हे देवा, मनुष्य व घोडा ह्यांचा मिश्र देह धारण करणारा हयग्रीव अवतार तूं आहेस. प्रलयकाळीं ब्रह्मदेवाच्या मुखांतून शंखासुरनामक दैत्यानें चोरून नेलेल्या वेदांना पाताळांतून आणून ते परत मागणाऱ्या ब्रह्मदेवाला तूं समर्पण केलेस, अशा तुज परमेश्वराला नमस्कार असो ॥ ६ ॥ हरिवर्षखंडामध्येंहि भगवान् नृसिंहरूपानें राहतो. हे राजा, तें रूप ग्रहण करण्याचें कारण पुढें मी तुला सांगेन. * दैवी गुणांचें पात्रच व महाभगवद्भक्त आणि दैत्य-दानवांच्या कुळाला पवित्र करणाऱ्या स्वभावानें व आचारणानें युक्त असा प्रल्हाद त्या खंडातील पुरुषांसह भगवंताच्या प्रिय स्वरूपाची एकनिष्ठ भक्ति करून उपासना करितो, आणि पुढील मंत्रांचा व स्तोत्रांचा जप करितो ॥७॥ " हे भगवंता नरसिंहा, तूं अंधकाराचा नाश करणाऱ्या अग्नि वगैरे तेजांचाहि प्रकाशक आहेस; तुला ॐकारपूर्वक वारंवार नमस्कार असो. तूं प्रकट हो, प्रकट हो! हे वज्रनखा, हे वज्रदंष्ट्रा, तूं आमच्या कर्मवासना जाळून टाक, आणि ॐस्वाहा' असें म्हणून आमचें अज्ञानरूप तम गिळून टाक, गिळून टाक. तसाच

---

* ही नृसिंहाची कथा पुढें सातव्या स्कंधांत आली आहे.

' ॐ क्षरौम् ' असें म्हणून या जीवाला वारंवार अभय प्राप्त होईल असें कर ॥ ८ ॥ हे प्रभो, सर्व जगाचें कल्याण असो. दुष्ट असेल त्यानें क्रूरपणा सोडून शांतता धरावी; सर्व प्राणिमात्रांनीं आपल्या बुद्धीच्या योगानें परस्परांचें कल्याण चिंतावें, त्यांच्या मनानें शांतीचें सेवन करावें; आमच्या व सर्व प्राण्यांच्या बुद्धीनें निष्काम होऊन, अधोक्षज-भगवंताच्या ठिकाणीं प्रवेश करावा ॥ ९ ॥ घर, स्त्रिया, पुत्र, द्रव्य व बंधु यांच्या ठिकाणीं कोठेंहि आम्हांला आसक्ति प्राप्त न होवो; जर कदाचित् झालीच तर ती भगवद्भक्तांच्या ठिकाणींच होवो. कारण, जो पुरुष, भगवद्भक्तांच्या संगतीमुळें विषयांच्या ठिकाणीं आसक्त न होतां प्राण वांचण्यापुरत्या आहारादि वृत्तीनें संतुष्ट व जितेंद्रिय असतो, त्याला लवकरच सिद्धि प्राप्त होत्ये. तशी गृहादिकांवर आसक्त असणाऱ्या पुरुषाला प्राप्त होत नाहीं ॥ १० ॥ भगवद्भक्तांच्या संगतीनें प्राप्त झालेल्या व अत्युत्तम पराक्रमानें संपन्न अशा भगवच्चरित्रांचें श्रवण करून त्यांचें नित्य सेवन करणाऱ्या पुरुषांच्या मनांमध्यें प्राप्त झालेला जन्मरहित भगवान्, मनांतील पापवासनारूप मळांचा नाश करितो आणि गंगादिक तीर्थें तर, वारंवार सेवन करणाऱ्या पुरुषांचा केवळ अंगसंबंधीं मात्र मळ हरण करितात, यास्तव त्या सत्पुरुषांचें कोण बरें सेवन करणार नाहीं ? ॥ ११ ॥ ज्या पुरुषाला भगवंताच्या ठिकाणीं निष्काम भक्ति असत्ये त्याच्यावर ईश्वराचा प्रसाद होतो आणि त्याच्याजवळ सर्व देव, धर्मज्ञानादि सर्व गुणांसह नित्य वास करितात. जो मनुष्य भगवंताची भक्ति करीत नाहीं व नुसत्या मनोराज्यानें बाहेरच्या मिथ्याभूत विषयांकडे धांवतो, त्या पुरुषाला, थोर पुरुषांचे ज्ञानवैराग्यादिक गुण कोठून प्राप्त होणार ? ॥ १२ ॥ ज्याप्रमाणें मत्स्यांचें जीवन उदकावरच अवलंबून असतें, म्हणून तें त्यांचा आत्मा होय. त्याप्रमाणें साक्षात् भगवान् श्रीहरि हाच देहधारि जीवांचा आत्मा होय. यास्तव त्याला सोडून जर एखादा अतिप्रसिद्धहि पुरुष, गृहामध्यें आसक्त झाला तर त्याचा मोठेपणा स्त्रीपुरुषरूप दंपत्यांतील पुरुषांच्या मोठेपणाप्रमाणें केवळ वयोमानावर अवलंबून असणाराच होईल ॥ १३ ॥ यास्तव हे दैत्य हो, तुम्ही तृष्णा, प्रीति, खेद, क्रोध, अहंपणा, काम, भीति, दैन्य व चिंता या सर्वांचें मूळ कारण आणि जन्ममरणरूप संसाराचें निरंतर फिरणारें चक्रच अशा घराचा त्याग करून, निर्भय अशा नृसिंहाच्या चरणाची सेवा करीत जा ! ॥ १४ ॥ तुला केतुलमालखंडामध्यें लक्ष्मीचें आणि संवत्सररूपी देवांच्या कन्यांचें व पुत्रांचें प्रिय करण्याच्या इच्छेनें कामदेवाच्या स्वरूपानें भगवान् राहतो. त्या कन्या व पुत्र त्या खंडाचे अधिपति असून, तीं पुरुषाच्या आयुष्यमानानें शंभर वर्षांच्या अहोरात्राइतकीं आहेत. या रात्रींच्या अभिमानी देवता ३६००० कन्या आणि दिवसांच्या अभिमानी देवता ३६००० पुत्र अशीं आहेत. प्रत्येक वर्षाच्या शेवटीं विष्णुचक्राच्या तेजानें त्या कन्यांच्या मनांत भीति उत्पन्न होते व त्यांचे गर्भ गर्भाशयांतून गळतात व मरून पडतात ॥ १५ ॥ तेथें राहणारा तो कामदेव, आपल्या अत्यंत सुंदर गतीच्या विलासानें शोभणाऱ्या व सुंदर मंदहास्ययुक्त पाहण्यामुळें किंचित् वर उचललेलें जें सुंदर भ्रुकुटिमंडळ त्याच्या योगानें अतिरमणीय दिसणाऱ्या मुखकमळाच्या शोभेनें

लक्ष्मीला रमवीत स्वतःचीं इंद्रियें तृप्त करितो ॥ १६ ॥ त्या भगवंताच्या मायामय स्वरूपाची उपासना, लक्ष्मीदेवी, रात्रीच्या वेळीं संवत्सररूप प्रजापतीच्या कन्यांना बरोबर घेऊन आणि दिवसाच्या वेळीं त्या कन्यांच्या पतींना बरोबर घेऊन पुढील मंत्राचा जप करित्ये ॥ १७ ॥ ती म्हणते,--" हे भगवान् कामदेवा, तूं इंद्रियांचा नियंता, सर्व प्रकारच्या उत्तम वस्तूंचें स्वरूप दर्शविणारा, क्रियाशक्ति, ज्ञानशक्ति, अंतःकरणांतील संकल्प, निश्चयादिक धर्म आणि त्यांचे विषय यांचा अधिपति; अकरा इंद्रियें व पांच विषय अशा सोळा अंशांनीं युक्त असून वेदोक्तकर्मांनीं प्राप्त होणारा, अन्नरूप, अमृतरूप, मनःशक्तिरूप, इंद्रियशक्तिरूप, देहशक्तिरूप असा सुंदर कामरूपी आहेस. ' ॐ ऱ्हाँ ऱ्हीं ऱ्हूँ ॐ या बीजाचा उच्चार करून मी तुला मनांतून व देहानें अशा दोन्ही प्रकारचा नमस्कार वारंवार करित्ये ॥ १८ ॥ हे भगवन्, ज्या स्त्रिया या लोकामध्यें स्वतःच इंद्रियांचा नियंता अशा तुझें, नाना प्रकारच्या व्रतांनीं आराधन करून तुझ्याजवळ अन्य पति प्राप्त होण्याविषयीं प्रार्थना करितात, त्यांना अन्य पति प्राप्त होतात; परंतु ते पति परतंत्र असल्यामुळें स्त्रियांच्या प्रिय मुलांचें, धनांचें व आयुष्याचें रक्षण करण्यास समर्थ होत नाहींत ॥ १९ ॥ जो स्वतः कोठूनहि कालादिकांपासून भयरहित असून कालादिकांच्या भयानें व्याकुळ झालेल्या लोकांचें सर्व प्रकारें रक्षण करितो, तोच खरा पति होय. अशा प्रकारचा पति तूं एकच आहेस. कारण, तूं पूर्णानंदलाभाहून कांहींच अधिक मानीत नाहींस. दुसऱ्या अज्ञानयुक्त विषयाभिलाषी दीन लोकांना परस्परांपासून भय असतें ॥ २० ॥ हे भगवन्, जी स्त्री त्या तुझ्या चरणकमलाचें केवळ पूजनच इच्छिते, फलाची इच्छा करीत नाहीं, तिचे सर्वच मनोरथ पूर्ण होतात आणि एखाद्या फलाची इच्छा धरून जर ती तुझी पूजा करील तर तूं तेंच एक फळ देतोस. अर्थात् तें फळ भोगून फुकट गेलें म्हणजे पुनः दुःख पावत्ये ॥ २१ ॥ हे अजिता, माझ्या प्राप्तीसाठीं, विषयसुखाची इच्छा करणारे ब्रह्मदेव, शंकर, देव आणि दैत्य वगैरे लोक उग्र तप करितात; परंतु तुमच्या चरणकमलाच्या सर्वोत्कृष्ट आश्रयावांचून त्यांना माझी प्राप्ति होत नाहीं. कारण, माझें हृदय तुमच्या ठिकाणींच असतें. ॥ २२ ॥ हे अजिता, ज्याच्या भजनावांचून कोणताच पुरुषार्थ नाहीं, असा तूं, आपलें जें सर्व मनोरथपूरक व भक्तांनीं स्तुति केलेलें हस्तकमळ भक्तांच्या मस्तकीं कृपेनें स्थापन केलें आहेस, तें माझ्याहि मस्तकीं स्थापन कर. हे सर्वश्रेष्ठा, तूं आपल्या वक्षःस्थलावर मला चिन्हरूपानें धारण केलें आहेस ! तेव्हां कर्तुं, अकर्तुं व अन्यथा कर्तुं समर्थ अशा मायेनें तूं काय करण्याचें योजिलें आहेस तें तर्कानें जाणण्यास कोण समर्थ आहे ? ॥ २३ ॥ रम्यकखंडामध्येंहि, त्या खंडाचा अधिपति अशा मनूला भगवंतानें जें आपलें अत्यंत प्रिय मत्स्यावताररूप पूर्वीं दाखविलें होतें, त्याची तो मनु आतांसुद्धां मोठ्या भक्तिभावानें आराधना करितो आणि पुढील मंत्राचा जप करितो ॥ २४ ॥ "सर्वांमध्यें मुख्य सत्त्वगुणप्रधान सूत्रात्मा, इंद्रियशक्तिरूप, अंतःकरणशक्तिरूप आणि देहशक्तिरूप असा जो महामत्स्यरूपी भगवान्,

त्याला माझा ॐकारपूर्वक बारंवार नमस्कार असो ॥ २५ ॥ जसा एखादा पुरुष, लांकडाच्या बाहुलीला सूत्राच्या योगानें बांधून आपल्या स्वाधीन करून ठेवितो, त्याप्रमाणें वेदरूपी मोठ्या शब्दानें युक्त अशा तूं, हें जग आपल्या स्वाधीन करून ठेविलें आहेस. तो तूं ब्रह्मादिक सर्व लोकपालांनाहि अदृश्य असून सर्व प्राण्यांच्या आंत प्राणरूपानें व बाहेर वायुरूपानें संचार करितोस ॥ २६ ॥ हे भगवन्, मत्सररूप ज्वरानें युक्त असे इंद्रादिक लोकपाल, वेगवेगळे राहून अथवा सर्व एकत्र मिळूनहि, प्राणरूपी तुझा त्याग करून मनुष्यादिक द्विपाद, गोमहिषादिक चतुष्पाद, तसेंच इतर जंगम व स्थावर, असें जें कांहीं वस्तुमात्र येथें दिसत आहे, त्यांतील थोड्यांचेंहि रक्षण करण्यास समर्थ झाले नाहींत ॥ २७ ॥ हे भगवन्, जन्मरहित अशा ज्या तूं, औषधि व वल्ली यांना आश्रयभूत अशा या पृथ्वीला माझ्यासह धारण करून आपल्या सामर्थ्यानें मोठमोठ्या लाटांनीं युक्त असलेल्या प्रलयकालीन समुद्रामध्यें पुष्कळ वेळपर्यंत संचार केलास, त्या जगताच्या प्राणसमूहाचें नियमन करणाऱ्या तुज भगवंताला नमस्कार असो ॥ २८ ॥ हिरण्मय खंडामध्येंहि कूर्मरूप धारण करणारा भगवान् वास करितो. त्याच्या त्या (आपणांस फार अडणाऱ्या भूतीची उपासना, तेथें राहणारा पितृगणांचा अधिपति अर्यमा, त्या खंडांतील पुरुषांसहवर्तमान करितो आणि पुढील मंत्राचा जप करितो ॥ २९ ॥ 'जो पूर्ण सत्त्वगुणप्रधान आहे, ज्याच्या राहण्याच्या ठिकाणचा पत्ता कोणाला लागत नाहीं, जो अमुक वर्षें वांचणारा अशा काळाच्या प्रमाणांत सांपडला नाहीं, अशा सर्वव्यापक व सर्वाधाररूप कूर्मरूपी तुज भगववंताला ॐकारपूर्वक बारंवार नमस्कार असो ॥ ३० ॥ हे भगवन्, नाना प्रकारच्या रूपांनीं नटलेलें व मायेनें प्रकाशित केलेलें हें पृथिव्यादि दृश्य जग, ज्या तुझेंच स्वरूप आहे, आणि वास्तविक स्वरूपानें अनुभव येत नसल्यामुळें ज्या तुझें खरें स्वरूप समजत नाहीं, त्या अनिर्वचनीय प्रपंचाकाररूपी तुज भगवंताला नमस्कार असो ॥ ३१ ॥ हे भगवन्, गर्भाशयांतून जन्म पावणारे मनुष्यादिक, घामादिकांपासून उद्भवणारे ढेंकूण इत्यादि, अंड्यांतून निघणारे पक्ष्यादिक आणि भूमीला फोडून अंकुरासारखे उगवणारे वृक्षादिक; तसेंच स्थावर, जंगम, देव, ऋषि, पितर, पंचमहाभूतें, इंद्रियें, स्वर्ग, अंतरिक्ष-लोक, भूमि, पर्वत, नद्या, समुद्र, द्वीपें, ग्रह आणि नक्षत्रें, अशा विविध नांवांनीं उच्चार करण्यास तूं एकच समर्थ आहेस ॥ ३२ ॥ असंख्य भेदांच्या नांवांनीं, रूपांनीं व आकारांनीं युक्त अशा ज्या तुझ्या ठिकाणीं कपिलादिकांनीं ही चोवीस तत्त्वांची संख्या स्पष्टीकरणासाठीं कल्पिली आहे, ती ज्या तत्त्वज्ञानाच्या योगानें दूर होत्ये, त्या सांख्यसिद्धांतरूपी तुज भगवंताला नमस्कार असो ॥ ३३ ॥ उत्तरकुरुनामक खंडाच्या ठिकाणींही वराहावतार धारण केलेला भगवान् यज्ञपुरुष राहतो. तेथें दिव्य रूप धारण करणारी ही भूमिदेवी कुरुखंडांत राहणाऱ्या पुरुषांसह त्या वराहरूपी भगवंताची उपासना करित्ये आणि पुढील मंत्रात्मक सर्वोत्कृष्ट उपनिषदाचा जप करित्ये ॥ ३४ ॥ हे भगवन्, मंत्रांनीं ज्याचें यथार्थ ज्ञान होतें, यज्ञ व क्रतु हें ज्यांचें स्वरूप आहे, मोठमोठे याग हे ज्याचे अवयव आहेत, कर्मांच्या योगानें जो शुद्ध आहे आणि तीन युगांमध्यें जो प्रसिद्ध असतो त्या तुज वराहरूपी

महापुरुषाला ॐकारपूर्वक वारंवार नमस्कार असो ॥ ३५ ॥ हे प्रभो, अनेक प्रकारचीं कर्मे व त्यांचीं फळें यांच्या योगानें प्रकाश न पावणारें असें तुझें स्वरूप आहे. तें पाहण्याची इच्छा करणारे ज्ञानी पुरुष जसें अग्निहोत्री अरणीरूप काष्ठामध्यें मंथनदंडानें अग्नीचें मंथन करितात, त्याप्रमाणें आपल्या देहेंद्रियादिकांचे ठिकाणीं मनोरूपी विवेकसाधनानें तुझें विवेचन करितात. असें केलें असतां तुझें स्वरूप प्रगट होतें, त्या तुला माझा नमस्कार असो ॥ ३६ ॥ यमनियमादिक साधनांनीं ज्यांची बुद्धि आत्मस्वरूप जाणण्यास समर्थ झाली आहे अशा पुरुषांनीं, विचाराच्या योगानें व विषय, इंद्रियांचे व्यापार, देवता, वेद, काल आणि अहंकार ह्या मायेच्या कार्यरूपी लक्षणांनीं, ज्याचें स्वरूप वास्तविकपणें जाणतां येतें, त्या मायानिमित्तक आकारानें रहित अशा तुज परमेश्वराला वारंवार नमस्कार असो ॥ ३७ ॥ जसें लोहचुंबकाचा आश्रय करणारें लोखंड, त्याच्या सान्निध्यामुळेंच भ्रमण पावतें, त्याप्रमाणें तुझ्या केवळ अवलोकनानेंच माया, आपल्या सत्त्वरजतमोरूप गुणांनीं, जगाचें स्थिति-संहारोत्पत्तिरूप कार्य करित्ये. गुणकर्मांचा साक्षी अशा त्या तुला नमस्कार असो ॥ ३८ ॥ जगाचा कारणभूत असा तूं वराहरूपी भगवान्, मला दाढेच्या टोंकावर धारण करून, रसातळापासून निघून प्रलयकालच्या समुद्रांतून हत्तीसारखा बाहेर पडलास व विरोध करण्यासाठीं पुढें आलेल्या दुसऱ्या हत्तीसारख्या हिरण्याक्ष दैत्याला मारून क्रीडा करीत राहिलास, त्या तुज समर्थ भगवंताला मी नित्य नमस्कार करित्ये ॥ ३९ ॥

**अठरावा अध्याय समाप्त**

---

# अध्याय १९ वा

श्रीशुकाचार्य म्हणाले,—हे राजा, किंपुरुषनामक खंडामध्यें लक्ष्मणाचा ज्येष्ठ भ्राता जो भगवान् आदिपुरुष सीतापति रामचंद्र, त्याच्या सेवेविषयीं तत्पर असलेला महाभगवद्भक्त हनुमान् किंनरांसहवर्तमान एकनिष्ठ भक्तीनें उपासना करितो ॥ १ ॥ आणि गंधर्वांनीं वारंवार गायन केलेली अशी, आपला स्वामी जो भगवान् रामचंद्र त्याची अत्यंत कल्याणकारक जी कथा, ती तो किंपुरुषांतील मुख्य अशा आर्ष्टिषेणासह एकाग्रचित्तानें श्रवण करितो व स्वतःहि पुढील स्तोत्र पठण करितो ॥ २ ॥ " ज्याची कीर्ति पवित्र आहे, ज्याचीं लक्षणें, स्वभाव व आचार हीं श्रेष्ठ आहेत, ज्यानें आपलें मन स्वाधीन करून घेतलें आहे, जो नित्य लोकमार्गाला अनुसरून वागत असतो, जो साधुपणाची कसोटीच आहे, आणि जो वस्तुतः परमेश्वर असून लोकसंग्रहाकरितां ब्राह्मणभक्त झाला आहे, त्या महापुरुषरूपी षड्गुणैश्वर्यसंपन्न राजाधिराज रामचंद्राला माझा ॐकारपूर्वक वारंवार नमस्कार असो ॥ ३ ॥ वेदांमध्यें जें एक, परमशुद्ध, अनुभवरूप, आपल्या प्रकाशानें अनेक प्रकारच्या जाग्रदादिक अवस्थांचा निरस करणारें, अंतर्यामि शांतरूप व बुद्धिमान् पुरुषानें ब्रह्म म्हणून ओळखिलेलें, नामरूपातीत व अंहकाररहित असें रामरूप तत्त्व प्रसिद्ध आहे, त्याला मी शरण जातों ॥४॥ प्रभूचा या भूतलावर जो रामरूपी मनुष्यावतार झाला आहे, तो केवळ रावणाच्या वधासाठींच झाला असें नव्हे, तर या संसारामध्यें स्त्रीसंगादिपासून होणारें दुःख दुर्निवार आहे, असें मनुष्यांना शिक्षण देण्याकरितांही तो झाला आहे. असें न म्हणावें तर स्वस्वरूपाच्या ठिकाणीं रममाण असणाऱ्या जगदात्मरूपी श्रीरामाला सीतेच्या विरहापासून दुःखें झालीं हें कसें झालें असतें ? ॥ ५ ॥ कारण, जो भगवान् रामचंद्र धीर पुरुषांचा आत्मा व अत्यंत हितकर्ता असल्यामुळें त्रैलोक्यामध्यें कोठेंहि आसक्त नव्हता, त्याला सीतावियोगापासून झालेलें दुःख प्राप्त झालें नसतें आणि त्यानें लक्ष्मणाचाहि त्याग केला नसता. अर्थात् त्याचीं कृत्यें, केवळ लोकशिक्षणाकरितांच होतीं ॥ ६ ॥ सत्कुलांत झालेला जन्म, त्या श्रीरामचंद्राच्या संतोषाला कारण झाला नाहीं. तसेंच सौंदर्य, वक्तृत्वबुद्धि किंवा आकारहि त्याला संतुष्ट करीत नसे. कारण, त्या लक्ष्मणाग्रज रामचंद्रानें, त्या कुलीनता, सौंदर्य इत्यादि गुणांनीं रहित अशाहि आम्हां अरण्यवासी वानरांचा मित्र म्हणून स्वीकार केला आहे ॥ ७ ॥ तस्मात् देव असो, दैत्य असो, मनुष्य असो अथवा पशुपक्ष्यादिक कोणीहि असो, जो सर्वात्मभावेंकरून उत्तम सुकृतज्ञ अशा मनुष्यावतार धारण करणाऱ्या रामरूपी श्रीहरीचें सेवन करील, तोच त्याला प्रिय होईल. तो श्रीराम पूर्ण कृपाळू असा आहे. त्यानें अयोध्यानगरवासी सर्व प्राणिमात्रांस आपल्याबरोबर विमानात बसवून स्वर्गास नेलें ॥ ८ ॥ या भरतखंडामध्येंहि ज्याचें स्वरूप लोकांना स्पष्टपणें कळत नाहीं, असा भगवान्, नरनारायणनामक दोन मूर्ति धारण

करून, बदरिकाश्रमांत कृपेनें धैर्यवान् पुरुषांवर अनुग्रह करण्याकरितां, कल्प संपेपर्यंत धर्मवृद्धि, ज्ञान, वैराग्य, ऐश्वर्य, शांति आणि विषयत्याग इत्यादि ज्या साधनांनीं आत्म्याचा अनुभव मिळतो त्यांचा आश्रय करून तप करीत राहिला आहे ॥ ९ ॥ त्या भगवंताची, भगवंतानें सांगितलेल्या सांख्यशास्त्र व योगशास्त्र यांसहवर्तमान, 'ज्यांमध्यें भगवंताचा पराक्रम वर्णन केलेला आहे अशा' पंचरात्रागमांचा सावर्णि मनूला उपदेश करणारा भगवान् नारद, वर्णाश्रमधर्मांचें आचरण करणाऱ्या भरतखंडांतील प्रजांसहवर्तमान उपासना करितो आणि पुढील मंत्राचा जप करितो ॥ १० ॥ इंद्रियांचा निग्रह करणें हाच ज्याचा स्वभाव आहे, अहंकारानें रहित असून भगवद्भक्त हेंच ज्याचें द्रव्य आहे, जो ऋषींमध्यें श्रेष्ठ आणि परमहंसांचाहि परमगुरु आहे व आत्मस्वरूपांत रममाण होणाऱ्या लोकांचा जो अधिपति आहे, त्या षड्गुणैश्वर्यसंपन्न नरनारायणाला माझा ॐकारपूर्वक वारंवार नमस्कार असो ॥ ११ ॥ असा जप करून आणखीहि तो पुढीलप्रमाणें गायन करितो. "ह्या जगाची उत्पत्ति, स्थिति व संहार हीं करणारा असतांहि जो 'मी कर्ता आहें' असा अभिमान धारण करीत नाहीं, देहामध्यें असूनहि देहासंबंधीं क्षुधा, तृषा, इत्यादि धर्मांनीं जो पराभव पावत नाहीं आणि द्रष्टा असतांहि दृश्य विषयांच्या योगानें ज्याच्या दृष्टीला विकार होत नाहीं, त्या निःसंग, परम पवित्र व सर्वसाक्षी परमेश्वराला नमस्कार असो ॥ १२ ॥ हे योगेश्वरा, भगवान् ब्रह्मदेवानें जें योगमार्गांतील निपुणत्व सांगून ठेविलें आहे, तें हेंच होय कीं, पुरुषानें देहाभिमान सोडून जन्मापासून केलेल्या भक्तीनें अंतकाळीं निर्गुण अशा तुज परमेश्वराच्या ठिकाणीं मन लावावें ॥ १३ ॥ हे भगवन्, मूढ पुरुष या लोकींच्या व परलोकींच्या विषयांवर आसक्त होऊन पुत्र, स्त्री व द्रव्य यांविषयीं नित्य चिंता करितो, व विष्ठादि मलांनीं पूर्ण व अनेक प्रकारच्या दुःखांचें स्थान अशा आपल्या शरिराचा नाश होईल म्हणून भीत असतो, तसाच ज्ञानी पुरुषहि जर भिऊं लागेल, तर त्याचा शास्त्रादिकांच्या ज्ञानसंपादनाविषयींचा प्रयत्न केवळ श्रमच होईल ॥ १४ ॥ तस्मात् हे प्रभो, हे अधोक्षजा, तूंच कृपा करून आपल्या ठिकाणीं आम्हांला स्वाभाविक प्रेमलक्षण भक्तियोग संपादन करितां येईल असें कर, म्हणजे त्याच्या योगानें आम्ही तुझ्या मायेनें या कुत्सित शरिराच्या ठिकाणीं स्थापित केलेल्या व दुसऱ्या उपायांनीं त्याग करण्यास अशक्य अशा अहंममतेचा लवकर त्याग करूं !" असें गायन केलें ॥ १५ ॥ हे राजा, या भरतखंडामध्यें नद्या व पर्वतहि पुष्कळ आहेत. त्यांमध्यें मलय, मंगलप्रस्थ, मैनाक, त्रिकूट, ऋषभ, कूटक, कोल्लक, सह्य, देवगिरि, ऋष्यमूक, श्रीशैल, वेंकट, महेंद्र, वारिधार, विंध्य, शुक्तिमान्, ऋक्षगिरि, पारियात्र, द्रोण, चित्रकूट, गोवर्धन, रैवतक, ककुभ, नील, गोकामुख, इंद्रकील आणि कामगिरि हे पर्वत मुख्य असून दुसरेहि शेंकडों हजारों पर्वत आहेत व त्यांच्या तटांपासून निघालेले नद व नद्याहि असंख्य आहेत ॥ १६ ॥ ह्या नद्या केवळ नामोच्चारणानेंसुद्धां लोकांना पवित्र करणाऱ्या असून यांच्या उदकांचा भरतखंडांतील सर्व प्रजा स्नानपानादिकांसाठीं उपयोग करितात ॥ १७ ॥ त्या नद्यांपैकीं, चंद्रवशा, ताम्रपर्णी,

अवटोदा, कृतमाला, वैहायसी, कावेरी, वेणी, पयस्विनी, शर्करावर्ता, तुंगभद्रा, कृष्णा' वेण्या, भीमरथी, गोदावरी, निर्विंध्या, पयोष्णी, तापी, रेवा, सुरसा, नर्मदा, चर्मण्वती' व सिंधु, अंध आणि शोण हे नद व महानदी, वेदस्मृती, ऋषिकुल्या, त्रिसामा, कौशिकी, मंदाकिनी, यमुना, सरस्वती, दृषद्वती, गोमती, सरयू, रोधस्वती, सप्तवती, सुषोमा, शतद्रु, चंद्रभागा, मरुद्वृधा, वितस्ता, असिक्नी आणि विश्वा ह्या महानद्या आहेत ॥ १८ ॥ ह्याच खंडामध्यें जन्म घेणारे पुरुष स्वतः आचरण केलेल्या सात्त्विक, राजस व तामस कर्मांच्या योगेंकरून त्या त्या कर्मानुसार देवलोकींच्या, मनुष्यलोकींच्या आणि नरकांतील अनेक गति मिळवितात; कारण कर्मानुसारेंच सर्व गति प्राप्त होत असतात आणि ज्या ब्राह्मणादि वर्णाला जे संन्यासग्रहणादिक मोक्षप्राप्तीचें साधन म्हणून सांगितलें आहे, त्या क्रमानें याच खंडामध्यें मनुष्यांना मोक्षहि प्राप्त होतो ॥ १९ ॥ हे राजा, सर्व भूतांचा आत्मा, रागादि दोषरहित, वाणींना अगोचर, आधाररहित, सर्वव्यापी व सर्वांतर्यामी अशा भगवान् वासुदेवाच्या ठिकाणीं कोणत्याहि कामनारूप कारणावांचून भक्ति जडणें हेंच मोक्षाचें स्वरूप होय. तो मोक्ष, जेव्हां भगवद्भक्तांचा फार वेळ समागम घडतो, तेव्हांच नाना प्रकारच्या गति प्राप्त होण्याचें कारण जो अविद्यारूपी हृदयग्रंथी तो तुटतो, आणि मोक्ष प्राप्त होतो ॥ २० ॥ हें भरतखंड मोक्षप्राप्तीचें साधन आहे; म्हणून यांत प्राप्त झालेल्या मनुष्यजन्माचें देवसुद्धां असें गायन करितात कीं, 'अहो, ज्याच्याविषयीं आम्हां देवांनाहि केवळ इच्छा उत्पन्न होते, तो मुक्तिदात्या भगवंताच्या सेवेविषयीं उपयोगी पडणारा भरतखंडांतील मनुष्यजन्म, ज्या मनुष्यांनीं मिळविला आहे, त्यांनीं जन्मांतरीं काय बरें आश्चर्यकारक पुण्यकर्म केलें असावें ? अथवा कांहीं साधन केल्यावांचून यांना हरि प्रसन्न झाला असावा काय ? ॥ २१ ॥ करण्यास फार कठीण, अशा यज्ञ, तपें, व्रतें व दानें इत्यादिकांनीं आम्हांला प्राप्त झालेल्या ह्या तुच्छ अशा स्वर्गाचें तरी काय फळ आहे ? कारण, येथें नारायणाच्या चरणकमलांची स्मृति नाहीं, व कदाचित् असली तरी ती अतिशय विषयभोगाच्या योगानें लोपून गेलेली आहे. ॥ २२ ॥ स्वर्गलोकाची तर वार्ता राहू दे, परंतु कल्पपर्यंत आयुष्य असणाऱ्या लोकांच्या पुनरावृत्तीनें युक्त अशा ब्रह्मलोकांच्या प्राप्तीपेक्षांहि अल्प आयुष्य असणाऱ्या मनुष्यांना भरतखंडभूमिरूप स्थानाची प्राप्ति होणें हें श्रेष्ठ आहे. कारण, विचारी पुरुष, तेथील क्षणभंगुर अशाहि देहानें क्षणामध्यें सर्व कर्मांचें ईश्वराच्या ठिकाणीं समर्पण करून हरीच्या पुनरावृत्तिरहित अभयस्थानास जाऊन पोंचतात ॥ २३ ॥ म्हणून ज्या ठिकाणीं भगवत्कथामृताच्या नद्या नाहींत व जेथें भगवत्कथा वर्णन करणारे भगवद्भक्त नाहींत, तसेंच जेथें मोठ्या गीतनृत्यदिक उत्साहांनीं युक्त असे भगवंताचे पूजाप्रकार नाहींत, तो लोक, ब्रह्मलोक जरी असेल तरी त्याचा सत्पुरुषांनीं आश्रय करूं नये ॥ २४ ॥ ज्ञानेंद्रियें, कर्मेंद्रियें व पंचमहाभूतें यांच्या कौशल्यानें पूर्ण अशा मनुष्यजन्माला या भरतखंडांत प्राप्त झालेले जे प्राणी आहेत त्यांना, पुनः मृत्यु न यावा यासाठीं जर प्रयत्न केला नाहीं तर ते पुन्हां, जसे वनांत राहणारे पक्षी, पारध्याच्या हातून एक वेळ सुटले असतांहि, फळांच्या लोभानें त्याच

वृक्षावर बेसावधपणें फिरूं लागले म्हणजे पुनः बंधन पावतात, त्याप्रमाणें बंधन पावतात ॥ २५ ॥ काय हो भरतखंडांतील लोकांचें भाग्य हें ? अहो ! या भरतखंडांतील मनुष्यांनीं यज्ञांमध्यें श्रद्धापूर्वक निरनिराळ्या इंद्र, अग्नि इत्यादि भिन्न भिन्न नांवानीं बोलावलेला, सर्व ऐश्वर्ये देणारा, एक, वस्तुतः परिपूर्ण असा हरि आनंदानें तेथें येऊन, विधी, मंत्र, द्रव्यें, यांच्यायोगानें देवतांच्या उद्देशानें दिलेलें व ' हें इंद्राला ' ' हें अग्नीला,' इत्यादि देवाना निरनिराळा निर्वाप केलेल्या चरुपुरोडाशादिक द्रव्यांचा ' हें माझें आहे ' अशा बुद्धीनें स्वीकार करितो ॥ २६ ॥ सकाम भक्तांनींहि प्रार्थना केलेला हरि, त्यांना मागितलेलें फळ देतो हें खरें आहे; तथापि तो त्यांना परमार्थ देत नाहीं. कारण, दिलेल्या फळाचा भोग झाला म्हणजे पुनः त्यांना फळ मागण्याची इच्छा होत्ये, आणि कोणतीच इच्छा न करणाऱ्या भक्तांना तर तो भगवान्, सर्व इच्छांची निवृत्ति करणारे आपले चरण-पल्लव आपण होऊन देतो ॥ २७ ॥ यास्तव जर आतां या वेळीं, आमचे चांगल्या यजनाचें, चांगल्या अध्ययनाचें अथवा दुसऱ्या कोणत्याहि चांगल्या कर्माचें, भोगलेल्या स्वर्ग-सुखाहून अवशेष पुण्य कांहीं राहिलें असेल, तर त्याच्या योगानें भरतखंडामध्यें आम्हांला जन्म प्राप्त होवो. कारण, तेथें हरि भक्तांना स्वानुभवरूप सुख देतो ॥ २८ ॥

श्रीशुकाचार्य म्हणाले, हे राजा, पूर्वी सगरराजाच्या पुत्रांनीं घोड्याचा शोध करीत असतांनां ही पृथ्वी सभोवार खणली, त्यावेळीं जंबुद्वीपाचे दुसरे आठ विभाग झाले आहेत, त्यांनांच जंबुद्वीपाचीं आठ उपद्वीपें असें कोणी म्हणतात ॥ ॥ २९ ॥ त्यांचीं नांवें, स्वर्णप्रस्थ, चंद्रशुक्र, आवर्तन, रमणक, मंदरहरिण, पांचजन्य, सिंहल आणि लंका हीं होत ॥ ३० ॥ हे भरतकुलश्रेष्ठा, याप्रमाणें तुला जंबुद्वीपाच्या खंडाचा विभाग मला माहित असल्याप्रमाणें वर्णन करून सांगितला आहे ॥ ३१ ॥

## एकोणिसावा अध्याय समाप्त

# अध्याय २० वा

शुकाचार्य म्हणाले,—हे राजा, आतां पुढें प्रमाण, लक्षण व रचना हीं सांगून प्लक्षादिक द्वीपांच्या खंडविभागांचें मी वर्णन करितों ॥ १ ॥ जसा मेरुपर्वत, जंबुद्वीपानें वेष्टिलेला आहे, त्याप्रमाणेंच हें जंबुद्वीप हि क्षारसमुद्रानें वेष्टिलेलें आहे; आणि या द्वीपाचा जितका विस्तार आहे तितकाच क्षारसमुद्राचाहि आहे. तसेंच, जसा खंदक बाहेरील उपवनानें वेष्टिलेला असतो त्याप्रमाणें क्षारसमुद्रहि त्याच्यापेक्षां दुप्पट विस्तृत असलेल्या प्लक्षनामक द्वीपानें सभोंवतीं वेष्टित आहे. या द्वीपामध्यें प्लक्ष म्हणजे पायरी या नांवाचा सुवर्णाचा वृक्ष असून त्यावरूनच याला प्लक्षद्वीप असें नांव मिळालें आहे. तो जंबुद्वीपांतील जांबळीएवढा, अकराशें योजनें उंच व अकराशें योजनें विस्ताराचा असून मुळांत शंभर योजनें घेराचा आहे. तेथें सप्तजिव्ह या नांवाचा अग्नि राहतो. द्वीपाचा अधिपति प्रियव्रताचा पुत्र इध्मजिव्ह होता. त्यानें त्या आपल्या द्वीपाचीं सात खंडें करून त्या खंडांचींच नांवें आपल्या सात पुत्रांना दिलीं, व तीं त्यांना वांटून आपण आत्मयोग-साधनानें स्वर्गास गेला ॥ २ ॥ त्या खंडांचीं व पुत्रांचीं नांवें, शिव, यवयस, सुभद्र, शांत, क्षेम, अमृत व अभय, अशीं होत. त्यांमध्यें सात पर्वत आणि नद्याहि सात याप्रमाणें प्रसिद्ध आहेत ॥३॥ मणिकूट, वज्रकूट, इन्द्रसेन, ज्योतिष्मान्, सुवर्ण, हिरण्यष्ठीव आणि मेघमाल, हे त्या खंडांचे विभाग पाडणारे सात पर्वत होत. तशाच प्रत्येक खंडांत एक एक अशा अरुणा, नृम्णा, आंगिरसी, सावित्री, सुप्रभाता, ऋतंभरा आणि सत्यंभरा, ह्या सात महानद्या आहेत आणि त्या नद्यांच्या स्नानपानादिकेंकरून ज्यांचा रजोगुण व तमोगुण नाहींसा झाला आहे, ज्यांना आयुष्य हजार वर्षें आहे आणि ज्यांचें रूप व अपत्योत्पत्ति ही देवाप्रमाणें सुन्दर आहेत असे हंस, पतंग, ऊर्ध्वायन आणि सत्यांग ह्या नांवाचे चार वर्ण वेदत्रयात्मक विद्येच्या योगानें स्वर्गाचें केवळ द्वारच अशा वेदत्रयप्रतिपाद्य, षड्गुणैश्वर्यसंपन्न, सर्वांतर्यामी सूर्यनारायणाचें तेथें पूजन करितात ॥ ४ ॥ "जो सत्याचा, ऋताचा, वेदाचा, मोक्षाचा आणि वारंवार प्राप्त होणाऱ्या जन्ममरणादिरूप संसाराचा नियंता असून प्राणपुरुष विष्णूचें स्वरूप आहे, त्या सूर्यनारायणाला आम्ही शरण जातों" असें म्हणून ते त्य, सूर्याचें स्तवनहि करितात." ॥ ५ ॥ प्लक्षादिक पांचहि द्वीपांमध्यें सर्व पुरुषांना आयुष्य, इंद्रियें, इंद्रियांचें पटुत्व, कांति, सहनशीलता, बल, बुद्धि आणि पराक्रम यांची स्वाभाविक सिद्धि सर्वांना सारखीच असत्ये ॥ ६ ॥ जसें प्लक्षद्वीप आपल्याएवढ्या दोन लक्ष योजनें विस्ताराच्या समुद्रानें वेष्टित आहे तसेंच त्याच्या दुप्पट म्हणजे चार लक्ष योजनें विस्ताराचें शाल्मलिद्वीपहि आपल्या इतक्या विस्ताराच्या सुरासमुद्रानें वेष्टित असून तें सर्व बाजूंनीं शोभत आहे ॥ ७ ॥ त्या द्वीपामध्यें वर सांगितलेल्या पायरीच्या वृक्षाएवढी म्हणजे अकराशें योजनें उंच व अकराशें योजनें विस्ताराची आणि शंभर योजनें

मुळांत घेर असलेली शाल्मलि म्हणजे सांवर आहे. तिच्यावर आपल्या अवयवभूत वेदांनीं ईश्वराची स्तुति करणाऱ्या भगवान् गरुडाचें घरटें आहे; व त्यावरून त्या द्वीपाला शाल्मलद्वीप असें नांव मिळालें आहे ॥ ८ ॥ त्या द्वीपाचा अधिपति प्रियव्रताचा पुत्र यज्ञबाहु असून, त्यानें आपल्या सात पुत्रांना त्यांचींच नांवें दिलेल्या त्या द्वीपाचीं सात खंडें वांटून दिलीं. सुरोचन, सौम्यनस्य, रमणक, देववर्ष, पारिभद्र, आप्यायन आणि अविज्ञात, अशीं त्यांचीं नांवें आहेत ॥ ९ ॥ त्या खंडांमध्यें खंडांच्या मर्यादा पाडणारे पर्वत व नद्या सात सातच प्रसिद्ध आहेत. स्वरस, शतशृंग, बामदेव, कुंद, मुकुंद, पुष्पवर्ष आणि सहस्रश्रुति हे सात पर्वत आणि अनुमती, सिनीवाली, सरस्वती, कुहू, रजनी, नंदा आणि राका ह्या सात नद्या ॥ १० ॥ त्या खंडांत राहणारे पुरुष श्रुतधर, वीर्यधर, वसुंधर आणि इषंधर, या नांवांच्या चार वर्णांचे असून ते वेदमय आत्मरूप भगवान् चंद्राची वेदमंत्रांनीं आराधना करितात ॥ ११ ॥ "जो कृष्णपक्षीं आणि शुक्लपक्षीं पितरांना, देवांना व सर्व प्रजांना अन्नाचा विभाग करीत असतो, तो सोम आमचा राजा असो असें म्हणून ते त्याची स्तुति करितात ॥ १२ ॥ याप्रमाणें सुरासमुद्राच्या बाहेर आठ लक्ष योजनें विस्तृत असें कुशद्वीप असून तें पूर्वीच्या द्वीपाप्रमाणेंच आठ लक्ष योजनें विस्तृत असलेल्या घृतसमुद्रानें वेष्टित आहे. त्या द्वीपाला नांव देणारें, दुसरा अग्निच कीं काय, असें प्रकाशमान असून परमेश्वरानें रचिलेलें एक दर्भाचें बेट आहे. तें आपल्या कोमल शिखांच्या कांतीनें सर्व दिशा प्रकाशित करितें ॥ १३ ॥ हे राजा, त्या द्वीपाचा अधिपति प्रियव्रताचा पुत्र हिरण्यरेतनामक असून त्यानें आपल्या वसु, वसुदान, दृढरुचि, नाभिगुप्त, स्तुत्यव्रत, विविक्त आणि बामदेव या नांवाच्या सात पुत्रांना आपल्या द्वीपाचे यथायोग्य सात विभाग करून दिले व आपण तप करावयास गेला ॥ १४ ॥ त्यांच्या खंडांमध्येंहि मर्यादापर्वत व नद्या सातसातच प्रसिद्ध आहेत. चक्र, चतुःशृंग, कपिल, चित्रकूट, देवानीक, ऊर्ध्वरोमा व द्रविण, हे सात पर्वत आणि रसकुल्या, मधुकुल्या, मित्रविंदा, श्रुतविंदा, वेदगर्भा, घृतच्युता व मंत्रमाला, ह्या त्या सात नद्या होत ॥ १५ ॥ त्याच्या उदकानें शुद्ध झालेले कुशल, कोविद, अभियुक्त आणि कुलक या नांवांचे चार वर्ण, अग्निस्वरूपी भगवंताचें यज्ञादि कर्मांत कौशल्य दाखवून पूजन करितात ॥ १६ ॥ "हे अग्ने, तूं साक्षात् परब्रह्मरूपी भगवंताचे हविर्भाग वाहून नेणारा आहेस, यास्तव पुरुषरूपी भगवंताच्या अवयवरूपी देवांच्या यज्ञानें, म्हणजे त्यांना अर्पण केलेल्या हविर्भागानें त्या पुरुषरूपी भगवंताचें यजन कर." अशी ते त्याची प्रार्थनाहि करितात. ॥ १७ ॥ जसें कुशद्वीप घृतसमुद्रानें वेष्टित आहे, त्या-प्रमाणेंच त्या घृतसमुद्राच्या बाहेर सोळा लक्ष योजनें विस्ताराचें क्रौंचद्वीप असून तें सोळा लक्ष योजनें विस्तृत अशा क्षीरसमुद्रानें सभोंवार वेष्टिलें आहे. त्या द्वीपामध्यें क्रौंचनामक एक महापर्वत असून त्यावरून त्या द्वीपाला त्याचें नांव मिळालें आहे ॥ १८ ॥ पूर्वीं कार्तिकस्वामीच्या शक्तिनामक आयुधानें या क्रौंचपर्वताच्या कडा तुटून गेल्या व त्यावरील लतामंडप उद्ध्वस्त झाले; तेव्हां क्षीरसमुद्रानें आपल्या पोटांत त्याला घेतलें व वरुणानें

त्याचें रक्षण केलें, त्यामुळें तो निर्भय झाला ॥ १९ ॥ त्या क्रौंचद्वीपामध्येंहि त्याचा अधिपति प्रियव्रताचा पुत्र घृतपृष्ठनामक असून त्यानें आपल्या पुत्राच्या नांवांनीं सात खंडें केली व त्यांमध्यें त्या आपल्या सात पुत्रांना प्रजापालनाच्या कामीं स्थापन करून आपण ज्ञानसंपन्न झाल्यावर ज्याची कीर्ति परम कल्याणकारक आहे, अशा भक्तांचीं दुःखें हरण करणाऱ्या सर्वांतर्यामी भगवंताच्या चरणकमलाला तो शरण गेला ॥ २० ॥ आम, मधुरुह, मेघपृष्ठ, सुधामा, भ्राजिष्ठ, लोहितार्ण आणि वनस्पती हे घृतपृष्ठाचे पुत्र होत. त्यांचे मर्यादापर्वत सात व नद्याहि सातच प्रसिद्ध आहेत. शुक्ल, वर्धमान, भोजन, उपबर्हिण, नंद, नंदन आणि सर्वतोभद्र हे सात पर्वत आणि अभया, अमृतौघा, आर्यका, तीर्थवती, वृत्तिरूपवती, पवित्रवती आणि शुक्ला अशा त्या तेथील सात नद्या होत. ॥ २१ ॥ त्यांचें निर्मळ व पवित्र उदक सेवन करणारे पुरुष, ऋषभ, द्रविण आणि देवक या नांवांचे त्या खंडांतील चार वर्णांचे पुरुष, उदकमय देवाचें उदकानें पूर्ण अशी अंजलि अर्पण करून आराधन करितात. ॥ २२ ॥ अहो उदकांनो, तुम्हांला ईश्वरापासून सामर्थ्य प्राप्त झालेलें असून भूलोक, अंतरिक्षलोक व स्वर्गलोक यांना तुम्हीं पवित्र करतां व आपल्या सामर्थ्यानें पापाचा नाश करतां, यास्तव तुमचें स्नानपान करणाऱ्या आमच्या देहांना तुम्ही पवित्र करा ॥ २३ ॥ याप्रमाणें पुढें क्षीरसमुद्राच्या बाहेर सभोंवार शाकद्वीप आहे. तें बत्तीस लक्ष योजनें विस्तृत असून तेवढ्याच विस्ताराच्या दह्याच्या मठ्ठ्याच्या समुद्रानें समोंवार वेष्टिलेलें आहे. त्यांत त्या द्वीपाला नांव देणारा असा, ज्यांचीं पानें आंतल्या बाजूनें खरखरीत व बाहेरच्या बाजूनें गुळगुळीत असतात असा शाक नांवाचा वृक्ष आहे. त्याच्या महासुगंधानें युक्त असलेला सुवास त्या द्वीपाला सुगंधित करीत असतो ॥ २४ ॥ त्याचा अधिपतिहि प्रियव्रताचा पुत्र मेधातिथि नांवाचा होता. त्या द्वीपाची आपल्या सात पुत्रांच्या नांवांनीं प्रसिद्ध अशीं सात खंडें करून त्यांमध्यें पुरोजव, मनोजव, पवमान, धूम्रानीक, चित्ररेफ, बहुरूप आणि विश्वाधार या नांवांच्या आपल्या पुत्रांना अधिपति नेमले व आपण स्वतः अनंतस्वरूपी भगवंताच्या ठिकाणीं आपलें मन लावून तपोवनांत निघून गेलो ॥ २५ ॥ त्या खंडांमध्येंहि ईशान, उरुशृंग, बलभद्र, शतकेसर, सहस्रस्रोत, देवपाल आणि महानस असे सात मर्यादापर्वत असून अनघा, आयुर्दा, उभयस्पृष्टि, अपराजिता, पंचपदी, सहस्रस्तुति आणि निजधृति अशा सात नद्याहि आहेत ॥ २६ ॥ त्या खंडांतील ऋतव्रत, सत्यव्रत, दानव्रत आणि अनुव्रत ह्या नांवांचे चार वर्णांचे पुरुष, प्राणायामाच्या योगानें आपला रजोगुण व तमोगुण दूर करून परमसमाधीच्या योगानें वायुरूपी भगवंताचें आराधन करितात ॥ २७ ॥ "जो आंत प्रवेश करून स्थावरजंगमात्मक प्राण्यांचें प्राणादिक वृत्तींच्या योगेंकरून रक्षण करितो आणि ज्याच्या स्वाधीन हें सर्व जग आहे तो साक्षात् अंतर्यामी ईश्वर, आमचें रक्षण करो" अशी ते त्यांची प्रार्थना करितात. ॥ २८ ॥ याप्रमाणेंच दह्याच्या मठ्ठ्याच्या समुद्राच्या बाहेर सभोंवतीं चौसष्ट लक्ष योजनें विस्तृत असें पुष्करद्वीप आहे. तें तितक्याच विस्ताराच्या गोड पाण्याच्या समुद्रानें बाहेरून वेष्टिलेलें आहे. त्यांत अग्नीच्या ज्वाळेप्रमाणें

निर्मळ अशा कोट्यवधि सुवर्णपत्रांनीं युक्त असें एक भगवान् ब्रह्मदेवाचें आसन झालेलें मोठें कमळ रचिलेलें आहे व त्यावरून ह्या द्वीपाचें पुष्कर असें नांव पडलें आहे ॥ २९ ॥ त्या द्वीपामध्यें मानसोत्तर नांवाचा दहा हजार योजनें उंचीचा व विस्ताराचा द्वीपासारखा मंडलाकार पूर्वोत्तर खंडाचा एकच मर्यादापर्वत आहे. त्याच्यावर पूर्व, दक्षिण, पश्चिम व उत्तर, ह्या चार दिशांकडे इंद्रादि चार लोकपालांच्या चार नगरी आहेत. तसेंच त्या पर्वतांवरून मेरूच्या सभोंवार फिरणाऱ्या सूर्यरथाचें संवत्सरात्मक चक्र देवांच्या अहोरात्रांनीं फिरत असतें. ॥ ३० ॥ त्या द्वीपाचाहि अधिपति प्रियव्रताचा पुत्र वीतिहोत्रनामक असून तोहि रमणक या धातकि या नांवाच्या आपल्या दोन पुत्रांना ह्या दोन खंडांचे अधिपति नेमून आरण आपल्या वडील भावांप्रमाणें ईश्वराराधनेमध्यें तत्पर होऊन राहिला आहे ॥ ३१ ॥ त्या खंडांतील पुरुष ब्रह्मसालोक्यादिकांना साधनभूत अशा कर्मानें ब्रह्मदेवस्वरूपी भगवंताचें आराधन करितात ॥ ३२ ॥ आणि " कर्मफलरूप, ब्रह्मप्राप्ति करून देणाऱ्या ब्रह्माच्याच ठिकाणीं निष्ठा असणाऱ्या अद्वितीय आणि शांत अशा त्या स्वरूपाचें लोक पूजन करितात. त्या भगवंताला आमचा नमस्कार असो " असें स्तोत्र गातात ॥ ३३ ॥

शुकाचार्य म्हणाले,—हे परीक्षित्‌राजा, त्या गोड पाण्याच्या समुद्राच्या पलीकडे, सभोंवार सूर्यप्रकाशयुक्त व सूर्यप्रकाशरहित अशा दोन प्रकारच्या प्रदेशांचा विभाग करण्याकरितां त्या दोन प्रदेशांच्या मधोमध लोकालोकपर्वत ईश्वरानें स्थापन केला आहे ॥३४॥ हे राजा, मानसोत्तरपर्वत व मेरुपर्वत यांच्यामध्यें जितकें अंतर आहे, तितकी भूमि शुद्धोदक समुद्रापलीकडे आहे. हिच्यावर प्राणी राहतात; पण हिच्या पलीकडे लोकालोक पर्वताजवळ दुसरी आठ कोटि एकुणचाळीस लक्ष योजनें अशी सारखी गुळगुळीत व चकचकीत भूमि असून तिच्यावर मात्र पडलेला पदार्थ पुनः कधींहि प्राप्त होत नाहीं. कारण, तेथें देवांवाचून इतर कोणीहि प्राण्यांचा प्रवेश होणें अशक्य आहे ॥ ३५ ॥ लोकमय प्रदेश आणि अलोकमय प्रदेश या दोन्हींचा सांधा जेथें मिळाला आहे तेथें हा पर्वत आहे, म्हणून याला लोकलोक असें नांव पडलें आहे ॥ ३६ ॥ तो पर्वत त्रैलोक्याच्या बाहेर सभोंवतीं परमेश्वरानें स्थापन केला आहे. त्याची उंची व विस्तार इतका आहे कीं, सूर्यापासून ध्रुवापर्यंत सर्व ज्योतिर्गणांचे त्या पर्वताच्या अलीकडचा त्रैलोक्याला प्रकाशित करणारे किरण कधींहि त्या पर्वताच्या पलीकडे जाऊं शकत नाहींत ॥ ३७ ॥ याप्रमाणें, लक्षणें व रचना, यांसह व्यासादिक कवींनीं विचारपूर्वक निश्चित केलेला लोकविस्तार इतकाच आहे. तो लोकविस्तार पन्नास कोटि योजनें असून गणती केलेल्या भूगोलाचा चौथा भाग म्हणजे साडेबारा कोटि योजनें हा लोकालोक पर्वत आहे ॥ ३८ ॥ त्या पर्वतावर चार दिशांकडे सर्व जगांचा गुरु अशा ब्रह्मदेवानें ऋषभ, पुष्कर, वामन आणि अपराजित असे जे चार दिग्गज स्थापन केले आहेत, ते सर्व लोकांना स्थिरपणें धारण करतात ॥ ३९ ॥ त्या दिग्गजांचें व आपल्या अंशतभूत इंद्रादि लोकपालांचें अनेकप्रकारचें सामर्थ्य वाढविण्यासाठीं आणि सर्व लोकांच्या कल्याणासाठीं आपल्या श्रेष्ठ अशा सुदर्शनादिक आयुधांनीं सुशोभित अशा बाहुदंडांनीं युक्त परम ऐश्वर्याचा अधिपति

विष्वक्सेनादिक आपल्या मुख्य मुख्य पार्षदांनी परिवेष्टित आणि धर्म, ज्ञान, वैराग्य, ऐश्वर्य व अष्टमहासिद्धि या लक्षणांनीं युक्त असें आपलें शुद्धसत्त्वात्मक स्वरूप धारण करणारा असा महापुरुषरूपी सर्वांतर्यामी जो भगवान्, तो त्या लोकालोकपर्वतावर निरंतर चहूंकडे फिरत असतो ॥४०॥ हे राजा, आपल्या योगामायेनें रचिलेल्या अनेक प्रकारच्या लोकयात्रेचें रक्षण करण्याकरितांच त्या भगवंतानें अशा प्रकारचा एक वेष कल्पसमाप्तीपर्यंत स्वीकारलेला आहे एवढाच याचा अर्थ. ॥ ४१ ॥ हा जो लोकालोकपर्वताच्या आंतील भूमीचा मेरुपर्वतापर्यंत एका बाजूनें साडेबारा कोटि योजनें बिस्तार सांगितला आहे, यावरूनच लोकालोकपर्वताच्या बाहेर ब्रह्मकटाहापर्यंत असलेलें जें अलोकभागाचें प्रमाण, तेहि सांगितल्यासारखेंच आहे. त्याच्या पलीकडे शुद्ध अशा योगेश्वरांची मात्र गति आहे. असें म्हणतात ॥ ४२ ॥ एतावता स्वर्ग आणि भूमि ह्या दोहोंचा जो मध्यभाग तो ब्रह्मांडाचा मध्यभाग होय. तेथेंच सूर्य असतो. सूर्याच्या आणि ब्रह्मांड-गोलकाच्या मध्यें सर्व बाजूंनीं ब्रह्मांड पंचवीस पंचवीस कोटि योजनें आहे ॥४३॥ तो सूर्य ह्या मृत अंडामध्यें झाला म्हणून त्याचें नांव मार्तंड असें पडलें आहे. तसाच तो पुष्कळ प्रकाशयुक्त अशा सुवर्णमय ब्रह्मांडापासून उत्पन्न झाला, म्हणून त्याला हिरण्यगर्भ असेंहि म्हणतात ॥४४॥ दिशा, आकाश, स्वर्ग, पृथ्वी, स्वर्ग व मोक्ष, नरक, आणि पाताळांतील स्थानें इत्यादि हे सर्व विभाग सूर्यानेंच पाडलेले आहेत ॥ ४५ ॥ म्हणून देव, पशु अदिकरून योनि, मनुष्य, सर्प, औषधि व इतर सर्व जीवांचे समुदाय ह्या सर्वांचा आत्मा सूर्यच असून चक्षुरिंद्रियाची अधिष्ठात्री देवताहि तोच आहे ॥ ४६ ॥

**विसावा अध्याय समाप्त**

---

# अध्याय २१ वा

शुकाचार्य म्हणाला,—हे राजा, ह्या भूमंडळाची रचना, विस्तारानें पन्नास कोटि योजनें व उंचीनें पंचवीस कोटि योजनें, इतकीच प्रमाण व लक्षणपूर्वक सांगितली आहे ॥ १ ॥ तज्ज्ञ पुरुष जसें पावटे वगैरे धान्यांच्या द्विदलांपैकीं एकाचें मान सांगून दुसऱ्याचें मान समजून घेण्यास सांगतात, तसें या पन्नास कोटि योजनात्मक प्रमाणानें स्वर्गलोकाच्या मंडळाचेंहि प्रमाण ते सांगतात. असो. भूगोल आणि खगोल यांच्यामध्यें त्या उभयतांनाहि लागून असें आकाश आहे ॥ २ ॥ त्या आकाशामध्यें ज्योतिर्गणाचा अधिपति भगवान् सूर्य आहे. तो आपल्या तापानें त्रैलोक्याला तप्त करितो आणि आपल्या प्रकाशानें प्रकाशित करितो. तोच हा सूर्य, उत्तरायण, दक्षिणायन आणि वैषुवत या नांवाच्या मंद, शीघ्र आणि मध्यम अशा गतींनीं चढण, उतरण व सपाटी अशा निरनिराळ्या ठिकाणीं कालानुरोधानें गमन करितो, आणि मकरादिराशींत संचार करून, दिवसरात्रींना अनुक्रमें मोठी, लहान किंवा सारखीं करितो ॥ ३ ॥ जेव्हां मेष आणि तुला ह्या राशींवर सूर्य असतो, तेव्हां दिवस व रात्रीं सारख्या असतात. जेव्हां वृषभादि पांच राशींत तो संचार करितो तेव्हां दिवस वाढत जातात आणि रात्रीं प्रत्येक महिन्यामध्यें एकेक घटिका कमी कमी होत जाते ॥ ४ ॥ जेव्हां वृश्चिकादिक पांच राशींवर सूर्य असतो, तेव्हां रात्री मोठ्या होऊन दिवस लहान होतात ॥ ५ ॥ सूर्याचें दक्षिणायन होईपर्यंत दिवस मोठे असतात आणि त्यानंतर उत्तरायण होईपर्यंत रात्री मोठ्या असतात ॥ ६ ॥ याप्रमाणें मेरुपर्वताच्या सभोंवार मानसोत्तर सूर्याची प्रदक्षिणा होण्याची लांबी नऊ कोट एक्कावन्न लक्ष योजनें आहे असें ज्ञानी पुरुष सांगतात. त्या मानसोत्तरपर्वतावर मेरूच्या पूर्वेस इंद्राची देवधानीनामक नगरी असून दक्षिणेस यमाची संयमनी आहे. पश्चिमेस वरुणाची निम्लोचनीनामक आणि उत्तरेस सोमाची विभावरी अशा नगरी आहेत. त्या चार नगरींमध्यें कालविशेषेंकरून प्राणिमात्रांची कर्मादिकांविषयीं प्रवृत्ति व निवृत्ति होण्यास कारण अशीं सूर्याची उदय, मध्याह्न अस्तमान आणि मध्यरात्र हीं मेरूच्या चारी दिशांकडे होतात ॥ ७ ॥ मेरुपर्वतावर असणाऱ्या लोकांना सूर्य निरंतर दिवसाच्या मध्यभागींच राहून प्रकाश देतो आणि तो अश्विन्यादि नक्षत्रांच्या मार्गानें चालत असल्यामुळें मेरूला डावा घालून जात असतो; परंतु प्रदक्षिणाकार फिरणाऱ्या प्रवहनामक वायूनें फिरविलेल्या ज्योतिश्चक्राच्या योगानें प्रतिदिवशीं तो मेरूला प्रदक्षिणा करीत आहे असें दिसतें ॥ ८ ॥ ज्या स्थानीं सूर्याचा उदय होतो त्याच्यासमोर शंकूच्या सरळरेषेंत सूत्र धरलें असतां तें ज्या दिशेकडील प्रदेशांत पडेल तेथें तो अस्तमान पावतो. जेथें तो लोकांना घाम उत्पन्न होईल इतका ताप देत असतो, म्हणजे मध्याह्नीं असतो, तेथून समोर सरळरेषेंत असलेल्या दिशेमध्यें तो गेला कीं मध्यरात्र करून लोकांना झोंप घेण्यास लावितो. कारण, ज्यांनीं पूर्वी

उदय व अस्तमान इत्यादि अवस्थांमध्यें सूर्याला पाहिलेलें असतें त्यांना त्या मध्यरात्रीच्या स्थळीं गेलेला सूर्य दिसत नाहीं ।। ९ ।। जेव्हां सूर्य इंद्राच्या नगरीपासून यमपुरीकडे जाऊं लागतो, तेव्हां पंधरा घटिकांनीं सव्वादोन कोटि आणि साडेबारा लक्षांपेक्षां कांहीं अधिक इतकीं योजनें जातो ।। १० ।। याप्रमाणेंच पुढें वरुणपुरीकडे, तेथून सोमपुरीकडे व तेथून इंद्रपुरीकडे तितक्या घटिकांनीं तितकीं योजनें जातो. तसेंच, चंद्रादिक दुसरे ग्रहहि ज्योतिश्चक्रावर नक्षत्रगणांसह उदय व अस्त पावतात ।। ११ ।। तात्पर्य, एका मुहूर्तामध्यें चौतीस लक्ष आठशेंपेक्षां कांहीं अधिक, सूर्याचा हा वेदमय रथ चार नगरींमध्यें संचार करितो ।। १२ ।। त्या रथाला, संवत्सररूप एक चक्र असून तें मासरूप बारा आरांनीं व ऋतुरूप सहा धांवांनीं आणि चातुर्मास्यरूप तीन मध्यमण्यांनीं युक्त आहे असें वर्णन केलेलें आहे. त्या रथाच्या आंसाचें एक टोंक मेरुपर्वताच्या मस्तकावर ठेवलेलें असून दुसरें टोंक मानसोत्तरपर्वतावर ठेवलेलें आहे. ज्या आंसामध्यें ओंवलेलें सूर्याच्या रथाचें चक्र, वायुबद्ध भूमीवर तेलाच्या घाण्याच्या चक्राप्रमाणें मेरूच्या सभोंवार फिरत असून मानसोत्तर पर्वतावर फिरत असतें ।। १३ ।। त्याच आंसावर छिद्र पाडून एक टोंक बसविलेला दुसरा एक आंस आहे तो त्या पहिल्या आंसाच्या एकचतुर्थांश म्हणजे एकोणचाळीस लक्ष सदतीस हजार पांचशें योजनें असून त्याचें दुसरें टोंक वायुपाशानें ध्रुवमंडळावर बांधलेलें आहे ।। १४ ।। सूर्याच्या रथांतील बसण्याची जागा तर छत्तीस लक्ष योजनें लांब असून नऊ लक्ष योजनें रुंद आहे आणि त्याचें जोखड नऊ लक्ष योजनें लांब आहे. त्याला अरुणनामक सारथ्यानें जुंपलेले छंद नांवाचे सात घोडे असून ते सूर्यदेवाला रथांतून वाहून नेतात ।। १५ ।। सारथ्याच्या कामावर योजिलेला तो अरुण, पूर्वाभिमुख बसलेल्या सूर्याच्या पुढें पश्चिमाभिमुख म्हणजे सूर्याकडे तोंड करून बसतो ।। १६ ।। त्याप्रमाणें सूर्याच्या पुढें स्तुति करण्याकरितां ईश्वरानें योजिलेले आंगठ्याच्या पेराएवढे साठ हजार वालखिल्य ऋषि त्या सूर्याची स्तुति करीत असतात ।। १७ ।। तसेंच दुसरेहि ऋषि, गंधर्व, अप्सरा, नाग, यक्ष, राक्षस आणि देव हे एकएकटे चौदा व दोन दोन मिळून सात गट करून प्रत्येक महिन्यामध्यें निरनिराळीं नांवें धारण करीत निरनिराळ्या कर्मांनीं प्रत्येक महिन्यामध्यें निरनिराळीं नांवें धारण करणाऱ्या सूर्याची जोडीजोडीनें उपासना करितात ।। १८ ।। असो. मानसोत्तरपर्वतावर भूमंडळाच्या सभोंवार वेराचा जो नऊ कोटि एक्कावन्न लक्ष योजनें इतका विस्तार आहे, त्यांपैकीं दोन हजार योजनें आणि दोन कोस, इतकें अंतर तो सूर्यनारायण एका क्षणामध्यें चालत असतो ।। १९ ।।

**एकविसावा अध्याय समाप्त**

---

# अध्याय २२ वा

राजा म्हणाला,—हे शुकाचार्या, मेरु पर्वत व ध्रुव यांना प्रदक्षिणा करीत फिरणाऱ्या भगवान् सूर्याचें, मेषादि राशींच्या सन्मुख अप्रदक्षिण गमन होतें असें जें हें आपण सांगितलें, हें विरुद्ध भासत असल्यामुळें आम्हीं खरें कसें समजावें ? ॥ १ ॥

शुकाचार्य म्हणाले,—हे राजा, जशी फिरत असणाऱ्या कुंभाराच्या चक्रानें, चक्रगतीच्या उलटगतीनें चालणाऱ्या पिपीलिकादिकांची गति वाटते, तशीं तीं पिपीलिकादिक निरनिराळ्या काळीं निरनिराळ्या स्थळीं आढळतात, आणि ध्रुवाला व मेरूला प्रदक्षिणा घालीत भराभर फिरत असणाऱ्या नक्षत्रराशियुक्त कालचक्रासह फिरणाऱ्या, परंतु ध्रुवाच्या व मेरूच्या अप्रदक्षिण क्रमानें असलेल्या नक्षत्रांच्या व राशींच्या सन्मुख चालणाऱ्या सूर्यादिकांची गति उलट दिसते. कारण, निरनिराळ्या काळीं निरनिराळ्या नक्षत्रांत व राशींत ते सूर्यादिक ग्रह दृष्टीस पडतात. असो ॥ २ ॥ वेद आणि ज्ञानी पुरुष ज्याचा तर्क करीत असतात तो हा भगवान् आदिपुरुष साक्षात् सूर्यनारायण, लोकांच्या कल्याणा-करितां वेदत्रयानें प्रतिपाद्य व कर्मांची शुद्धि करणाऱ्या अशा कालस्वरूपी आपल्या स्वरूपाचे बारा विभाग करून, वसंतादि सहा ऋतूंमध्यें कर्मभोगास योग्य असे शीतोष्णादि धर्म उत्पन्न करितो ॥ ३ ॥ या मनुष्यलोकामध्यें वर्ण, आश्रम आणि आचार, यांना अनुस-रणारे लोक, त्या सूर्यरूपी भगवंताचे, वेदत्रयानें सांगितलेल्या संध्या, अग्निहोत्र वगैरे कर्मांनीं इंद्रादि देवरूपानें व ध्यानादिक योगमार्गानें तसेंच अंतर्यामिरूपानें श्रद्धापूर्वक आराधन करीत अनायासानें कल्याण पावतात ॥ ४ ॥ तो हा लोकांचा आत्मा सूर्य स्वर्ग आणि भूमी ह्यांमधील आकाशमंडळांत फिरत असलेल्या कालचक्रावर राहून संवत्सराचे अवयव जे मेषादि बारा मास त्यांचा उपभोग घेतो. तो एक एक मास चांद्रमानानें शुक्ल व कृष्ण या दोन पक्षांचा, पितरांच्या मानानें एका अहोरात्राचा आणि सौरमानानें सव्वादोन महानक्षत्रांचा असतो तो सूर्य, जितक्या कालानें संवत्सराचा सहावा भाग भोगतो त्या कालाला ऋतु असें म्हणतात. हा तरी संवत्सराचा एक अवयवच होय ॥ ५ ॥ त्या सूर्याला अर्धा आकाशमार्ग चालण्यास जितका काळ लागतो त्या काळाला अयन असें म्हणतात ॥ ६ ॥ तसेंच मंद, शीघ्र व मध्यम अशा तिन्ही गतींत भूमि व स्वर्ग यांच्या मंडळासह आकाशमंडळाचें पूर्णपणें उल्लंघन करण्यास त्या सूर्याला जो काळ लागतो त्याला संवत्सर, परिवत्सर, इडावत्सर, अनुवत्सर आणि वत्सर अशीं पांच नांवें दिलेलीं आहेत ॥ ७ ॥ अशा प्रकारें चंद्र, सूर्याच्या किरणांहून वर लक्ष योजनांच्या अंतरावर दिसत असून तो सर्वांच्या पुढें व अतिजलद चालणारा असल्यामुळें सूर्याचा वर्षानें होणारा राशिभोग एक महिन्यांत व महिन्यानें होणारा राशिभोग सव्वादोन नक्षत्रांत, व पंधरा दिवसांनीं होणारा राशिभोग एकच दिवसांत भोगितो ॥ ८ ॥ आणि शुक्लपक्ष व कृष्णपक्ष यांत

अनुक्रमें वृद्धिगत व क्षीण होणाऱ्या आपल्या कलांनीं तो देवांचीं व पितरांचीं अहोरात्रें करीत असून अन्नमय असल्यामुळें आणि सर्व जीवसमूहांचा प्राणरूप व जीवनहेतु असल्यामुळें सर्वांचा जीवरूप असलेला असा तो तीस तीस मुहूर्तांनीं एकेक नक्षत्राचा उपभोग घेतो ॥ ९ ॥ जो हा दहा इंद्रियें, पंचमहाभूतें व एक मन ह्या सोळा कलांनीं युक्त, मनोमय, अन्नमय आणि अमृतमय असा पुरुषरूपी भगवान् चंद्र सांगितला, ह्या चंद्राचा, देव, पितर, मनुष्यें, भूतें, पशु, पक्षी, सर्प आणि लता यांचें प्राणरक्षण करणें व वृद्धि करणें असा स्वभाव असल्यामुळें ह्याला सर्वमय असें म्हटलें आहे ॥ १० ॥ चंद्रमंडळापासून वरती तीन लक्ष योजनें अभिजिन्नामक नक्षत्रासह अठ्ठावीस नक्षत्रें कालचक्रामध्यें ईश्वरानें योजलेलीं आहेत; तीं मेरूच्या दक्षिणेकडून फिरत असतात ॥ ११ ॥ त्यांच्यावरतीं दोन लक्ष योजनें उंचीवर शुक्र आहे. तो शीघ्र, मंद आणि मध्यम अशा तीन प्रकारच्या गतींनीं सूर्याच्या पुढें, मागें अथवा बरोबर सूर्यासारखाच संचार करीत असतो. हा वृष्टि करणारा असल्यामुळें बहुधा लोकांना अनुकूलच आहे. हा केव्हां केव्हां क्रमानें पुढें आलेल्या नक्षत्रांचें उल्लंघन करून वृष्टीचा प्रतिबंध करणाऱ्या ग्रहाचा उपशम करितो असें अनुमान होतें ॥ १२ ॥ शुक्राच्या गतीप्रमाणेंच बुधाचीहि गति आहे; परंतु तो सोमपुत्र बुध शुक्राच्यावर दोन लक्ष योजनें उंच असून बहुतकरून लोकांना शुभकारक आहे. एखादे वेळीं तो जेव्हां सूर्याचें उल्लंघन करून पुढें दूर जातो, तेव्हां मात्र तो अतिशय वारा, अभ्रप्राय मेघ आणि अनावृष्टि इत्यादि भयें सुचवितो ॥ १३ ॥ त्या बुधाच्यावर मंगळहि दोन लक्ष योजनें उंच आहे. तो जर वक्रगतीनें चालला नाहीं, तर तीनतीन पक्षांनीं एकेक अशा क्रमानें बारा राशि भोगितो. तो बहुतकरून अशुभ ग्रह असून दुःखसूचक आहे ॥ १४ ॥ त्या मंगळाच्यावर दोन लक्ष योजनें उंच स्थळीं भगवान् बृहस्पति राहतो. तो जर वक्र झाला नाहीं, तर प्रत्येक राशींत एकेक वर्ष राहतो व तो बहुतकरून ब्राह्मणकुळाला अनुकूल असतो ॥ १५ ॥ त्याच्यावर दोन लक्ष योजनें उंच शनैश्वर ग्रह आढळतो. तो मंदगति असल्यामुळें प्रत्येक राशींत तीस तीस महिने चालत असतो व तीस वर्षांनींच बारा राशी भोगितो. तो बहुधा सर्वांना अशुभकारक आहे ॥ १६ ॥ त्यावर अकरा लक्ष योजनें अंतरावर कश्यपादि सप्तर्षि आढळतात. ते निरंतर लोकांचें कल्याण चिंतीत असून भगवान् विष्णूच्या श्रेष्ठ पदाला प्रदक्षिणा घालीत असतात ॥ १७ ॥

## बाविसावा अध्याय समाप्त

# अध्याय २३ वा

श्रीशुकाचार्य म्हणाले, त्या सप्तर्षिमंडळाच्या पुढें तेरा लक्ष योजनें अंतरावर ज्याला विष्णूचें उत्तमपद असें म्हणतात तें स्थान आहे. जेथें महाभगवद्भक्त उत्तानपादराजाचा पुत्र ध्रुव अजूनहि राहतो. त्या ध्रुवाभोंवतीं त्याच्याबरोबरच नक्षत्ररूपानें तेथें जोडून ठेवलेले अग्नि, इंद्र, प्रजापति आणि कश्यप हे बहुमानपूर्वक प्रदक्षिणा करितात. कल्पपर्यंत वांचणाऱ्या व भूलोकापासून महर्लोकापर्यंत राहणाऱ्या लोकांच्या उपजीविकेचा तो आश्रय आहे. त्या ध्रुवाचा या मनुष्यलोकांतील पराक्रम पूर्वीं मीं तुला सांगितलाच आहे ॥ १ ॥ तो ध्रुव निरंतर चालत असणाऱ्या व ज्याचा वेग कोणालाहि कळून येत नाहीं अशा भगवद्रूपी कालचक्रानें गरगर फिरविलेल्या ग्रहनक्षत्रादिक सर्व तेजोगोलकांच्या समूहांचा ईश्वरनिर्मित असा आधारस्तंभच असून तेथें निरंतर प्रकाशमान होत आहे ॥ २ ॥ जसें शेतकऱ्यानें धान्य मिळण्याकरितां मेढीच्या सभोंवर दावणीवर बांधून ठेविलेले मळणीचे बैल, सकाळीं, दुपारीं व संध्याकाळीं आपली जागा न सोडितां त्या मेढीच्या सभोंवार फेऱ्या घालतात, त्याप्रमाणें या कालचक्रावर त्रैलोक्याच्या आंत व बाहेर ईश्वरानें योजिलेले सूर्यादिग्रह व आश्विन्यादि नक्षत्रगण हे ध्रुवाचाच आश्रय करून फिरविले गेलेले, कल्पपर्यंत त्याच्या सभोंवार फिरत असतात आणि जसे आकाशामध्यें वायूनें प्रेरणा केलेले मेघ किंवा श्येनादिक पक्षी, आपआपले पंख हालविणें वगैरे कर्माच्या साह्यानें फिरत असून खालीं पडत नाहींत, त्याप्रमाणें प्रकृति आणि पुरुष यांच्या संयोगाची कृपा झालेले व ज्यांना कर्माचेंच साहाय्य आहे असे ते नक्षत्रगणादिक कालचक्राच्या आधारानें फिरत असून, भूमीवर पडत नाहींत ॥ ३ ॥ कित्येक लोक म्हणतात कीं, हें ज्योतिश्चक्र भगवान् वासुदेवाच्या योगधारणेंतील शिशुमारनामक स्वरूपांत पाहिलेलें आहे ॥ ४ ॥ हा भगवंताचा शिशुमारनामक दक्षिणावर्त कुंडलाकार देह, खालीं डोकें व वर पुच्छ करून लांबच लांब पसरलेला आहे. त्याच्या पुच्छाग्रावर ध्रुवाची कल्पना केलेली आहे. पुच्छाग्राच्या अधोभागीं प्रजापति, अग्नि, इंद्र व धर्म हे आहेत. पुच्छाच्या मूळ भागीं धाता आणि विधाता हे आहेत व कमरेचे ठिकाणीं सप्तर्षि आहेत. जसे कुंडलाकार शरिराच्या मगराच्या डाव्या व उजव्या अशा दोन्हीं बाजूंना सारख्या संख्येचे अवयव असतात, त्याप्रमाणें त्या दक्षिणावर्त कुंडलाकारशरीरीं शिशुमाराच्या उजव्या बाजूला, अभिजितापासून पुनर्वसूपर्यंत चौदा उत्तरायण नक्षत्रें कल्पिलेलीं आहेत. तशींच त्याच्या डाव्या बाजूलाहि पुष्यापासून उत्तराषाढापर्यंत चौदा दक्षिणायन नक्षत्रें कल्पिलेलीं आहेत, व त्याच्या पृष्ठभागीं अजवीथी असून उदरावर आकाशगंगा आहे ॥ ५ ॥ हे राजा, पुनर्वसु आणि पुष्य हीं दोन नक्षत्रें अनुक्रमानें शिशुमाराच्या डाव्या आणि उजव्या कटिप्रदेशीं, आर्द्रा आणि आश्लेषा हीं उजव्या आणि डाव्या पाठीमागच्या पायांवर, अभिजित् आणि उत्तराषाढा हीं उजव्या व

डाव्या नाकपुड्यांवर, श्रवण व पूर्वाषाढा हीं उजव्या व डाव्या डोळ्यांवर, धनिष्ठा व मूळ हीं उजव्या व डाव्या कानांवर आणि मघादिक आठ दक्षिणायन नक्षत्रें डाव्या बाजूला बरगड्यांवर योजावींत. तशींच मृगशीर्षादिक उत्तराभाद्रपदापर्यंतचीं आठ उत्तरायण नक्षत्रें उजव्या बाजूच्या बरगड्यांवर उलट योजावींत. शततारका आणि ज्येष्ठा हीं उत्तरदक्षिणायनांतील राहिलेलीं नक्षत्रें त्याच्या उजव्या व डाव्या खांद्यांवर मांडावींत ॥ ६ ॥ त्या शिशुमाराच्या वरच्या हनुवटीवर अगस्ति, खालच्या हनुवटीवर नक्षत्ररूपी यम, मुखावर मंगळ, उपस्थावर शनि, वशिंडावर बृहस्पति, वक्षःस्थळावर सूर्य, हृदयावर नारायण, मनामध्यें चंद्र, नाभीवर शुक्र, स्तनांवर अश्विनीकुमार, प्राण व अपान या दोहोंच्या ठिकाणीं बुध, गळ्यामध्यें राहु, सर्व अवयवांवर केतु, आणि सर्व रोमांवर सर्व तारागण आहेत ॥ ७ ॥ हे राजा, मनुष्यानें शुचिर्भूत होऊन व मौनव्रत धारण करून, भगवान् विष्णूच्या ह्या सर्व देवतामय स्वरूपाचें प्रतिदिवशीं संध्याकाळीं दर्शन घ्यावें आणि "ज्योतिर्गणांचा आश्रय, कालचक्ररूपी आणि देवांचा अधिपति अशा महापुरुषाचें आम्ही नमस्कारपूर्वक ध्यान करितों" अशा अर्थाच्या मंत्रानें त्याचें स्तवन करावें ॥ ८ ॥ हे राजा, ग्रहनक्षत्रतारामय असें हें देवाधिपति विष्णूचें स्वरूप ज्या अर्थीं पूर्वोक्त मंत्रांचा त्रिकाल जप करणाऱ्या पुरुषांच्या पापाचा नाश करितें, त्या अर्थीं जो पुरुष, ह्याला त्रिकाल नमस्कार करितो अथवा ह्याचें स्मरण करितो त्याचें, त्या त्या प्रातःकालादिक तिन्ही काळीं उत्पन्न होणारें पातक तत्काळ नाश पावतें ॥ ९ ॥

**तेविसावा अध्याय समाप्त**

---

# अध्याय २४ वा

शुकाचार्य म्हणाले,—बा राजा, सूर्यमंडळाखालीं दहा हजार योजनांवर राहू असून तो नक्षत्राप्रमाणें संचार करीत असतो, असें कोणी म्हणतात. या राहूला भगवत्कृपेमुळेंच ग्रह होतां येऊन अमरत्वहि प्राप्त झालें. कारण तो वस्तुतः सिंहिकेचा पुत्र व दैत्यांमध्यें अधम असल्यामुळें तीं दोन्हीं प्राप्त करून घेण्यास तो स्वतः पात्र नव्हता. त्याचें जन्मवृत्त व पराक्रम मी तुला पुढें सांगेन ॥ १ ॥ हे राजा, अत्यंत ताप उत्पन्न करणाऱ्या सूर्याचें जें हें मंडळ दिसतें, तें दहा हजार योजनें विस्तृत आहे. चंद्राचें बारा हजार योजनें आहे, आणि राहूचें तेरा हजार योजनें आहे असें म्हणतात. त्या राहूनें पूर्वी अमृतपान करते वेळीं सूर्य-चंद्रांच्यामध्यें शिरून त्यांना अडथळा केला होता. त्या प्रसंगानें उत्पन्न झालेलें वैर मनांत धरून तो राहु अद्यापि अमावास्या आणि पौर्णिमा या दिवशीं सूर्यचंद्रांच्या अंगावर धांवून जातो ॥ २ ॥ तें जाणून भगवंतानें सूर्याच्या व चंद्राच्या रक्षणाकरितां आपलें सुदर्शननामक प्रिय अस्त्र योजून ठेविलें आहे; तें सहन करण्यास अशक्य असून वारंवार चंद्र-सूर्यांभोंवतीं फिरत असतें. चंद्र-सूर्यांसमोर थोडा वेळ उभा राहणारा तो राहु, त्या चक्राच्या तेजानें भय पावतो आणि हृदयामध्यें चकित होऊन दुरूनच माघारा फिरतो. त्यालाच लोक ग्रहण असें म्हणतात ॥ ३ ॥ त्या राहूच्या खालीं दहा हजार योजनांवर सिद्ध, चारण व विद्याधर यांचीं स्थानें आहेत ॥ ४ ॥ त्यांच्या खालीं यक्ष, राक्षस, पिशाच, प्रेत व भूतगण यांचें खेळण्याचें अंगणच असें आकाश असून त्याची मर्यादा जोंपर्यंत वायु वाहतो व मेघ उपलब्ध होतात तेथपर्यंत आहे. ॥ ५ ॥ त्याच्या खालीं शंभर योजनें अंतरावर ही पृथ्वी असून तेथपर्यंत हंस, भास, ससाणे, गरुड इत्यादि मोठमोठे पक्षी उड्डाण करितात, तेथपर्यंत तिची मर्यादा आहे. ॥ ६ ॥ हे राजा, भूमीची रचना कशी आहे तें तुला मी पूर्वींच सांगितलें आहे. भूमीच्याहि खालीं सात भूविवरें एकाखालीं एक अशीं दहा हजार योजनें अंतरावर आहेत व त्यांचा विस्तार ब्रह्मांडकटाहाच्या विस्ताराइतका आहे. त्यांचीं नांवें अतल, वितल, सुतल, तलातल, महातल, रसातल आणि पाताल हीं होत ॥७ ॥ हे राजा, स्वर्गापेक्षांहि अधिक असलेले कामभोग, ऐश्वर्यानंद आणि संपत्ति यांच्या योगानें ज्यांतील मंदिरें, उपवनें व विहारस्थळें भरून गेलीं आहेत अशा बिलरूपी स्वर्गांत, ज्यांच्या स्त्रिया, मुलें, बंधु, मित्र व सेवक हीं नित्य आनंदी व प्रेम करणारीं आहेत व ज्यांच्या इच्छा ईश्वर भग्न करीत नाहीं, असे मायेच्या योगानें विहार करणारे दैत्य, दानव व सर्प हे वास करीत असतात ॥ ८ ॥ हे राजा, त्या बिलस्वर्गांत मायावी यमासुरानें निर्माण केलेल्या नगरी, नाना प्रकारच्या श्रेष्ठ रत्नांनीं बांधलेलीं चित्रविचित्र गृहें, कोट, वेशी, सभा, अंगणीं, देवालयें इत्यादिकांनीं आणि नाग, असुर व जोड्यांनीं राहणारे पारवे, राघू व साळुंक्या, इत्यादि पक्ष्यांनीं

गजबजून गेलेल्या उपवनांतील कृत्रिम भूमींनीं आणि तळघरें असलेल्या उत्तम गृहांनीं शोभत असतात ॥ ९ ॥ तेथील उपवनें मनाला व इंद्रियांना अत्यंत आनंद देणाऱ्या पुष्पांच्या व फळांच्या घोंसांनीं आणि सुंदर पल्लवांनीं ज्यांच्या मनोहर खांद्या लवलेल्या आहेत व ज्यांना वल्लींनीं आपल्या अवयवांनीं आलिंगन दिलें आहे अशा वृक्षांनीं शोभत असतात, त्याप्रमाणेंच स्वच्छ उदकानें भरलेल्या व ज्यांच्यामध्यें चक्रवाकादिक अनेक पक्ष्यांचीं जोडपीं वास करीत आहेत अशीं सुंदर सरोवरें तेथें असून त्यांतील पाणी सुसरींच्या समुदायांच्या हालचालींमुळें खवळून जातें. त्यांच्या पाण्यांत कमळें, कुमुदें, कुवलयें, कल्हारें, कमलोत्पलें व तांबडीं शंभर पानांचीं कमळें असून त्यांच्या समूहांत पक्षी घरटीं करून सतत क्रीडा करीत नाना प्रकारचे मधुर शब्द करितात. त्या शब्दांनीं इंद्रियांना संतोष होऊन तीं उपवनें, देवलोकांच्या शोभेपेक्षांहि अतिशय सुशोभित दिसतात ॥ १० ॥ तेथें सूर्यादि ग्रह नसल्यामुळें दिवस, रात्र व वर्ष इत्यादिक काळाच्या विभागांनीं उद्भवणारें भय मुळींच नाहीं ॥ ११ ॥ तेथें श्रेष्ठ श्रेष्ठ महाभुजंगांच्या मस्तकांवरील मणि सर्व अंधकाराचा नाश करीत असतात ॥ १२ ॥ या बिलस्वर्गांत वास करणारे लोक, दिव्य औषधींचे रस व रसायनें यांनींच अन्नपान व स्नानादिक करतात; म्हणून त्यांना चिंता, व्याधि, अंगास वळ्या पडणें, केंस पिकणें, म्हातारपण, देह निस्तेज होणें, दुर्गंधि, घाम, श्रम व ग्लानि इत्यादि वयोनिमित्तक अवस्था प्राप्त होत नाहींत ॥ १३ ॥ त्या पुण्यवंतांना भगवंताच्या चक्र नांवाच्या तेजाशिवाय दुसऱ्या कशापासूनहि मृत्यु प्राप्त होत नाहीं ॥ १४ ॥ मात्र तें भगवंताचें चक्ररूप तेज तेथें प्रविष्ट झालें असतां त्या असुरस्त्रियांचे गर्भ भयामुळें स्रवून पतन पावतात ॥ १५ ॥ असो. अतल नांवाच्या बिलस्वर्गांत मयासुराचा पुत्र बलनामक दैत्य राहतो. त्यानें या लोकीं पूर्वीं शहाण्णव प्रकारच्या माया निर्माण केल्या होत्या, त्यांपैकीं कांहीं माया अजूनहि कोणी मायावी दैत्य उपयोगांत आणितात. एके वेळीं त्या बलासुरानें जांभई दिली, त्या वेळीं त्याच्या मुखापासून स्वैरिणी, कामिनी आणि पुंश्चली असे तीन प्रकारचे दुःशील स्त्रियांचे गण उत्पन्न झाले. त्या स्त्रिया, त्या बिलस्थानामध्यें प्रवेश केलेल्या पुरुषाला, तेथें हाटक नांवाचा एक प्रकारचा रस आहे तो पाजून संभोग करण्याविषयीं समर्थ करून घेतात आणि आपलें विलास-युक्त अवलोकन, प्रेमळ हास्य, गुह्य भाषण व आलिंगन इत्यदिकांच्या योगेंकरून त्याच्याशीं आपण यथेष्टपणें रममाण होऊन त्यालाहि रमवितात. त्या हाटकरसाचें सामर्थ्य असें आहे कीं, तो सेवन केला असतां पुरुष, आपणाला दहा हजार मोठाल्या हत्तींइतकी शक्ति आहे असें मानितो आणि मदांध झाल्यासारखा 'मी ईश्वर आहें; अशी कल्पना करितो ॥ १६ ॥ त्याच्या खालीं वितलनामक विवरामध्यें सर्व दुःख हरण करणारा हाटकेश्वरनामक भगवान् शंकर आपल्या पार्षद नांवाच्या भूतगणांना बरोबर घेऊन ब्रह्मदेवाच्या सृष्टीची वृद्धि करण्यासाठीं भवानीसह संभोग करीत राहिला आहे; त्या भवनीशंकराच्या वीर्यापासून हाटकीनामक एक मोठी नदी उत्पन्न झाली आहे. तेथें वायूच्या योगानें प्रज्वलित झालेला अग्नि, आपल्या बलानें तें वीर्य प्राशन करतो. त्यानें प्राशन केलेलें तें वीर्य हाटक नांवाचें सुवर्ण होतें. तें सुवर्ण

दैत्याधिपतींच्या अंतःपुरांतील स्त्रिया व पुरुष अलंकाररूपानें धारण करितात ॥१७॥ त्या वितलाच्या खालीं सुतलामध्यें, पूर्वी इंद्राचें प्रिय करण्याविषयीं इच्छा करणाऱ्या भगवंतानें अदितीच्या पोटीं अवतार धारण करून, वटु वामनरूपानें बलीपासून त्रैलोक्य हरण केलें; परंतु पुनः भगवंतानें कृपा करून बलीला त्या सुतलामध्यें स्थापित केलें. तो उदारकीर्ति, पुण्यश्लोक, विरोचनाचा पुत्र बलिराजा इंद्रादि लोकपालांसहि प्राप्त न झालेल्या अतिसमृद्ध संपत्तीनें युक्त असून स्वधर्मानें आराधन करण्यास योग्य अशा त्याच भगवंताचें आराधन करीत अजूनहि निर्भयपणें तेथें राहिला आहे ॥ १८ ॥ हे राजा, बलिराजाला सुतलाचें जें राज्य प्राप्त झालें हें त्यानें केलेल्या भूमिदानाचे प्रत्यक्ष फळ नव्हे; कारण सर्व जीवसमुदायांचा जीव व आत्मा असा जो अतिपवित्र परमात्मा वासुदेव तो प्राप्त झाला असतां त्याला परमश्रद्धेनें अत्यंत आदरपूर्वक व समाधानयुक्त अंतःकरणानें अर्पण केलेल्या व म्हणून साक्षात् मोक्षाचें द्वारच झालेल्या, अशा त्या भूमिदानाचें फळ एवढेंच कसें होईल ? ॥ १९ ॥ शिंक येणें, पडणें, अडखळणें इत्यादि क्षुल्लक संकटांमध्यें नकळतांहि एकवार त्याच्या नांवाचा उच्चार करणारा पुरुष कर्मबंध सहज तोडून टाकितो; पण त्या कर्मबंधाच्या निवृत्तीसाठीं कित्येक मुमुक्षु पुरुष सांख्ययोगादि अन्य साधनांचे अनेक क्लेश भोगितात ॥ २० ॥ तेव्हां सर्व भक्तांना आत्मस्वरूप देणाऱ्या व ज्ञानी जनांना ज्ञान देणाऱ्या भगवंताला आपलेपणानें अर्पण केलेल्या भूमिदानाचें, सुतलाचें राज्य एवढेंच फळ होणें शक्य नाहीं ॥ २१ ॥ आणि भगवंतानें तरी या बलीला जें ईश्वराच्या स्मरणाचा नाश करणारें असें मायामय भोगाचें ऐश्वर्य दिलें, तो कांहीं खरोखर त्याच्यावर मोठा अनुग्रह केला असें म्हणतां येत नाहीं ॥ २२ ॥ त्या बलीची भक्ति तशीच एकनिष्ठ होती. दुसरा उपायच न मिळाल्यामुळें भगवंतानें याचनेच्या मिषानें त्याचें शरीर मात्र अवशेष ठेवून बाकीचें सर्व त्रैलोक्य हरण केलें आहे आणि त्याला वरुणपाशांनीं बांधून पर्वताच्या गुहेमध्यें प्रतिबंधांत ठेविलें; पण अशाहि स्थितींत बलीनें काय सांगितलें बरें ? ॥ २३ ॥ तो म्हणाला, "अहो, ज्यानें प्रत्यक्ष बृहस्पतीला मसलतीकरितां एकांतभक्तीनें साहाय्यक नेमिलें आहे, तो हा इंद्र लोकदृष्ट्या विद्वान् असूनहि ईश्वरप्राप्तीरूप स्वार्थाविषयीं खरोखर निपुण नाहीं. कारण, त्यानें ईश्वरप्राप्तिरूप आपला स्वार्थ सोडून, प्रसन्न झालेल्या विष्णूच्या द्वारानें माझ्याजवळ त्रैलोक्यांतील विषयभोगच मागितले, त्या भगवंताजवळ त्याचें दास्य मागितलें नाहीं. अनन्तावधि अशा कालाचें एक मन्वंतर होतांच जें उलथून पडतें त्या ह्या त्रैलोक्याची कथा ती काय ? ॥ २४ ॥ आमचा आजा स्वार्थाविषयीं मोठा निपुण होता; पिता हिरण्यकशिपु मरण पावला असतां, प्रत्यक्ष भगवान् आपण होऊन त्याचें राज्यपद देत असतांहि, तें भगवंताहून निराळें आहे, असें समजून प्रल्हादानें त्याचा स्वीकार केला नाहीं, तर भगवंताचें निरंतर दास्यच मागून घेतलें ॥२५॥ त्या महासमर्थ प्रल्हादाच्या मार्गाला, ज्याचे रागद्वेषादि मळ धुऊन गेले नाहींत व ज्याच्यावर भगवंताचा अनुग्रह झाला नाहीं असा आमच्यासारखा कोण बरें पुरुष अनुसरण्याची इच्छा करील ॥ २६ ॥ शुकाचार्य म्हणाला,—हे राजा, ज्याचें अंतःकरण स्वभक्तांविषयीं सदय आहे आणि ज्यानें दिग्विजयास्तव निघालेला रावण, बलीच्या द्वारामध्यें प्रवेश करीत असतां,

त्याला आपल्या पायांच्या अंगठ्यानें दहा कोटि योजनें दूर उडवून दिलें, तो षड्गुणैश्वर्य-संपन्न, सर्व जगतांचा गुरु प्रत्यक्ष नारायण, हातामध्यें गदा घेऊन ज्याच्या द्वारामध्यें उभा राहिला आहे, त्या बलिराजाचें चरित्र मी तुला पुढें विस्तारानें वर्णन करीन ॥२७॥ असो. त्या सुतलाच्या खालीं तलातल आहे. त्रैलोक्याचें कल्याण करण्याची इच्छा करणाऱ्या भगवान् शंकरानें ज्याचीं तिन्ही पुरें दग्ध करून टाकिलीं, परंतु पुनः त्या महादेवाच्याच प्रसादानें ज्याला स्थान मिळालें व महादेवानेंच त्याचें चोहोंकडून रक्षण केलें असल्यामुळें सुदर्शनचक्रा-पासूनहि ज्याला मुळींच भय राहिलें नाहीं, अशा मायावी लोकांचा परमगुरु त्रिपुराधिपति मयासुर नांवाचा दैत्यराज तेथें असून तेथील लोक त्याला पूज्य मानितात ॥२८॥ त्याच्याखालीं महातलामध्यें, कश्यपाच्या कद्रूनामक स्त्रीपासून झालेल्या अनेक फड्यांच्या सर्पांचा क्रोधवशनामक एक गण राहत असतो. त्यांतील कुहक, तक्षक, कालीय, सुषेण इत्यादिक अतिदीर्घ व स्थूल देह धारण करणारे सर्प, श्रीहरीचें वाहन अशा पक्षिराजाधिपति गरुडाला निरंतर भीत असतात. त्यामुळें क्वचित्प्रसंगींच आपले पुत्र, स्त्रिया, मित्र व कुटुंब त्यांच्या संगतीनें उत्पन्न होऊन क्रीडा करितात ॥ २९ ॥ महातलाखालील रसातळामध्यें दितीचे व दनूचे पुत्र पणीनामक, निवातकवचनामक, हिरण्यपुरवासी व कालेय हे वास करीत असतात. हे जन्मतःच महापराक्रमी व महासाहस कर्म करणारे असे देवांचे शत्रु होत. ज्यांचा पराक्रम सर्व लोकांत प्रसिद्ध आहे, अशा श्रीहरीच्या सुदर्शनचक्रानें त्यांचा स्वपराक्रमाविषयींचा मद नष्ट झाला असून ते बहुधा सर्पासारखे लपूनछपून राहतात. एकदां सरमानामक इंद्रदूतीनें 'तुम्ही इंद्राच्या हातून मरण पावाल !' अशा अर्थाच्या शब्दांनीं त्यांना धमकी दिल्यामुळें ते इंद्राला भीत असतात ॥ ३० ॥ त्या रसातळाखालीं पाताळांत वासुकिप्रमुख मोठमोठ्या देहाचे आणि अत्यंत क्रोधिष्ठ असे शंख, कुलिक, महाशंख, श्वेत, धनंजय, धृतराष्ट्र, शंखचूड, कंबल, अश्वतर व देवदत्त इत्यादि नागलोकाधिपति वास करितात. त्यांना पांच, सात, दहा, शंभर, किंवा हजार फडा असून त्यांवरील तेजःपुंज अशा रत्नांच्या तेजामुळें पाताळांतील सर्व अंधकार दूर होतो ॥ ३१ ॥

**चोविसावा अध्याय समाप्त**

---

# अध्याय २५ वा

श्रीशुकाचार्य म्हणाले,–हे राजा, त्या पाताळलोकाच्या तळाशीं तीस हजार योजनें अंतराबर अनंत ह्या नांबानें प्रसिद्ध अशी भगवंताची तामसीमूर्ति आहे. सात्वततंत्राविषयीं निष्ठा धारण करणारें भक्तजन चतुर्व्यूहोपासनेमध्यें त्याला संकर्षण असें म्हणतात. कारण 'हा मी' हा अभिमान त्याचें लक्षण असून तो द्रष्टा आणि दृश्य या दोहोंचें एकीकरण करितो ॥ १ ॥ हजार मस्तकें असणाऱ्या अशा त्या अनंतमूर्ति भगवान् शेषाच्या एकाच मस्तकावर धारण केलेलें हें भूमंडळ मोहरीप्रमाणें दिसतें ॥ २ ॥ प्रलयकाळीं ह्या जगाचा नाश करण्याची त्याला इच्छा होते व त्या वेळीं क्रोधानें वक्र झालेल्या त्याच्या सुंदर व हालणाऱ्या भुवयांमधून अकरा प्रकारच्या निरनिराळ्या मूर्ति घेऊन तीन नेत्र धारण करणारा संकर्षणनामक रुद्र आपला तीन अग्रांचा शूल उभारून बाहेर पडतो ॥ ३ ॥ त्याच्या चरणकमळावरील आरक्तवर्ण व निर्मळ अशा नखरूप रत्नसमूहांत श्रेष्ठ भक्तांसह एकनिष्ठ भक्तीनें प्रणाम करणारे सर्वांचे अधिपति, प्रसन्नचित्त होऊन, सभोंवतीं स्फुरण पावणाऱ्या कुंडलांच्या कांतीनें भूषित झालेल्या गालांनीं युक्त अशीं आपलीं सुंदर मुखें अवलोकन करितात ॥ ४ ॥ त्याच्या सुंदर शरीरमंडलावर निर्मळ, मोठे, पांढरे, सुंदर व मनोहर असे बाहू रुप्याच्या खांबांप्रमाणें शोभत असून कृष्णागरु, चंदन व केशर ह्यांची उटी त्यांना लाविलेली असते. त्या भुजांना विषयभोगाची इच्छा करणाऱ्या नागकन्या त्या उटीचा लेप करीत असतात. त्यांच्या स्पर्शानें त्यांचें हृदय शुद्ध होऊन त्यांत मदनाचा प्रवेश होतो. त्या वेळीं त्या मनोहर व विलासयुक्त असें मंद हास्य करितात आणि प्रेमानें व मदानें आनंदित व आरक्तवर्ण झालेलें त्यांचें कृपाकटाक्षांनीं युक्त असें मुखकमल सलज्ज मुद्रेनें अवलोकन करितात ॥ ५ ॥ तोच हा अनंत गुणांचा समुद्र असा आदिदेव भगवान् अनंतनामक शेष दुसऱ्याच्या उत्कर्षाविषयीं असहिष्णुता व क्रोध या दोहोंचा वेग आपले ठिकाणीं आवरून धरून लोकांच्या कल्याणासाठीं तेथें राहिला आहे ॥ ६ ॥ हे राजा, देव, दैत्य, सर्प, सिद्ध, गंधर्व, विद्याधर आणि मुनींचे समुदाय त्याचें ध्यान करितात. तो निरंतर मदानें आनंदित असून त्याचे डोळे फिरून गेलेले व धुंद झालेले असतात. तो आपल्या मधुर भाषणानें आपल्या पार्षदांना व देवसमूहांच्या अधिपतींना आनंद देतो. त्याचीं वस्त्रें निळीं असून त्याच्या कानांत कुंडलें आहेत; त्याचा सुंदर व मनोहर बाहू नांगराच्या पाठीवर ठेविलेला असून उदार लीला दाखविणारा भगवान् शेष, इंद्राचा ऐरावत जशी गळ्यांत सुवर्णाची सांखळी धारण करितो त्याप्रमाणें केव्हांहि म्लान न होणारी व नूतन तुळशीच्या स्वादिष्ट मधुरसानें गुंग झालेल्या भ्रमरसमूहांच्या मधुर गायनानें सुशोभित झालेली अशी वैजयंतिनामक वनमाला धारण करितो ॥ ७ ॥ हे राजा, तो हा अनंत

भगवान् आपलें ध्यान करणाऱ्या आपलें माहात्म्य श्रवण करणाऱ्या मुमुक्षुजनांच्या हृदयांमध्यें प्रविष्ट होऊन फार प्राचीन काळापासून कर्मवासनांनीं घट्ट झालेला त्यांचा सत्त्वरजतमोमय असा अविद्यारूप हृदयग्रंथी तत्काळ तोडून टाकितो असें भगवान् ब्रह्मपुत्र नारदानें तुंबरूसह ब्रह्मदेवाच्या सभेमध्यें त्याच्या प्रतापाचें वर्णन केलें आहे ॥८॥ ते म्हणतात, "ह्या जगाच्या उपत्तिस्थितिसंहारांना कारण असे सत्त्वादिक मायेचे गुण, याच्याच दृष्टिपातानें आपआपलें कार्य करण्यास समर्थ झाले. त्यानें एकट्यानेंच आपल्या स्वरूपांमध्यें अनेक प्रकारच्या कार्यांनीं परिपूर्ण असा हा प्रपंच धारण केला आहे. अनादि व अनंत असें ब्रह्म त्याचेंच स्वरूप असल्यामुळें त्या ब्रह्मरूप शेषनामक भगवंताचें तत्त्व लोकांना कसें बरें समजेल? ॥ ९ ॥ त्याच्याच ठिकाणीं हें स्थूलसूक्ष्मात्मक जगत् प्रकाश पावतें. त्याचीं चरित्रें लोकांना तारणारीं असून त्या भगवंताची आम्हांवर विपुल दया आहे. त्यानें शुद्धसत्त्वात्मक स्वरूप धारण केलें असून त्यानें आपल्या भक्तजनांचीं मनें आपणांकडे लागण्यासाठीं सिंहानें केलेल्या निर्दोष पराक्रमाचें ग्रहण केलें आहे ॥ १० ॥ दुःखनिवृत्तीसाठीं अथवा थट्टेनें जरी त्याचें नांव उच्चारिलें, तरी चंडाळ देखील शुद्ध होईल हें काय सांगावें? ज्या अर्थीं हा परम पवित्र भगवानच आपल्या नांवानें मनुष्याचें सर्व पाप तत्काळ नाहींसें करितो, त्या अर्थीं त्या शेषभगवंताहून दुसऱ्या कोणाचा बरें मुमूक्षूनें आश्रय करावा? ॥ ११ ॥ अहो सभासद हो, ज्या सहस्र मस्तकांनीं युक्त असलेल्या शेषाच्या एकाच मस्तकावर स्वेच्छेनें स्थापन केलेला असा हा पर्वत, नद्या, समुद्र आणि प्राणी ह्यांनीं भरलेला भूगोल अणुरेणूसारखा राहतो, त्या अपरिमित पराक्रमाच्या विश्वव्यापक अनंताच्या पराक्रमाची गणना हजारजिह्वा असलेलाहि कोणता पुरुष करील बरें? ॥१२॥ असो. ज्याचा प्रभाव अचिंत्य आहे, ज्याचे पराक्रम व गुण अपरिमित आहेत व जो जगाच्या रक्षणाकरितां अनायासानें भूमीचें धारण करितो, तो स्वतंत्र भगवान् अनंत, या पृथ्वीच्या मुळाशीं राहिला आहे ॥ १३ ॥ हे राजा, ह्या प्रवृत्तिमार्गामध्यें विषयाची इच्छा धरणाऱ्या पुरुषांना प्राप्त होण्यास योग्य व या लोकीं केलेल्या कर्माप्रमाणें बांधून दिलेल्या ज्या गति आहेत त्या ह्याच होत. ह्या मी गुरुमुखापासून जशा ऐकिल्या तशा तुला सांगितल्या आहेत ॥ ॥ १४ ॥ हे राजा, प्रवृत्तिरूप धर्माला अनुसरणाऱ्या पुरुषाला त्या धर्माचें फळ म्हणून उत्तम, मध्यम व निकृष्ट अशा ज्या कांहीं गति प्राप्त होतात, त्या तुझ्या प्रश्नाप्रमाणें मीं तुला सांगितल्या आहेत. आतां दुसरें काय सांगावें? ॥ १५ ॥

## पंचविसावा अध्याय समाप्त

# अध्याय २६ वा

राजा म्हणाला,—हे महर्षे, जीवलोकाला, उत्तम, मध्यम व कनिष्ठ अशा तीन प्रकारच्या गति प्राप्त होतात म्हणून तूं जें भोगाचें विचित्र तत्त्व मला सांगितलेंस तें कसें घडतें ? ॥ १ ॥

शुकाचार्य म्हणाले,—हे राजा, सर्व प्राण्यांचीं कर्में जरी कांहीं अंशीं सारखीं असलीं तथापि कर्ता सात्त्विक, राजस व तामस असल्यामुळें त्यांची श्रद्धा निरनिराळी असल्ये, म्हणून सात्त्विक श्रद्धेनें कर्त्याला सुख प्राप्त होतें, राजस श्रद्धेनें सुख व दुःख प्राप्त होतें; आणि तामस श्रद्धेनें दुःख व मूढपणा प्राप्त होतो. याप्रमाणें निरनिराळ्या प्रकारच्या सर्वहि कर्मांचीं फळें तारतम्यानें सर्वांस प्राप्त होतात ॥ २ ॥ आतां, श्रुतिस्मृतींनीं निषेध केलेल्या धर्मालाच मुख्यत्वेंकरून अनुसरून जो पुरुष त्याचें आचरण करितो, त्याच्या श्रद्धा निरनिराळ्या असल्यामुळें त्याच्या कर्मांचें फळहि त्यांना निरनिराळेंच मिळतें; यास्तव अनादि अविद्येच्या योगानें पुरुषांना प्राप्त झालेल्या अधर्माचें फल म्हणून ज्या हजारों गति प्राप्त होतात त्यांपैकीं मुख्य मुख्य गतींचें आतां मी तुला वर्णन करितों ॥ ३ ॥

राजा म्हणाला,—हे भगवन् मुने, नरक म्हणून जे सांगितले आहेत ते भूमीवरील कांहीं विशिष्ट देशविशेष आहेत किंवा ते भूमिव्यतिरिक्त अंतरिक्षामध्यें अथवा ब्रह्मांडाच्याहि बाहेर आहेत ? ॥ ४ ॥

शुकाचार्य म्हणाले,—हे राजा, त्रैलोक्यामध्येंच दक्षिणेकडे भूमीच्या खालीं व गर्भोदकाच्या वर असलेल्या प्रदेशामध्यें ते आहेत. त्या दक्षिणदिशेसच अग्निष्वात्त आदिकरून पितृगण, आपल्या गोत्रांतील प्राण्यांना अखंड विषयभोग मिळावे असें चिंतन करीत व पूर्ण एकाग्रतेनें भगवंताचें आराधन करीत असतात ॥ ५ ॥ त्या दिशेलाच भगवंताच्या आज्ञेप्रमाणें वर्तणूक करणारा पितरांचा राजा भगवान् सूर्यपुत्र यम आपल्या सेवकांसह वास करीत असून तो आपल्या सेवकांनीं आपल्या देशामध्यें आणिलेल्या मृत प्राण्यांना त्यांचे जसे कर्मदोष असतील त्याचप्रमाणें यथायोग्य शिक्षा करितो ॥ ६ ॥ त्याठिकाणीं कोणी एकवीस नरक मुख्य आहेत असें म्हणतात. हे राजा, आतां त्या नरकांचीं नांवें, रूपें व लक्षणें मी तुला अनुक्रमानें सांगतों. १ तामिस्र, २ अंधतामिस्र, ३ रौरव, ४ महारौरव, ५ कुंभीपाक, ६ कालसूत्र, ७ असिपत्रवन, ८ सूकरमुख, ९ अंधकूप, १० कृमिभोजन, ११ संदंश, १२ तप्तसूर्मि, १३ वज्रकंटकशाल्मली, १४ वैतरणी १५ पूयोद, १६ प्राणरोध, १७ विशसन, १८ लालाभक्ष, १९ सारमेयादन, २० अवीचि, २१ अयःपान हे एकवीस आणि मतांतरानें १ क्षारकर्दम, २ रक्षोगणभोजन, ३ शूलप्रोत, ४ दंदशूक, ५ अवटनिरोधन, ६ पर्यावर्तन, व ७ सूचिमुख, हे सात असे एकंदर अठ्ठावीस नरक असून ते प्राण्यांनीं नाना प्रकारच्या यातना

भोगण्याच्या जागा आहेत ॥ ७ ॥ जो पुरुष दुसऱ्याचें द्रव्य, पुत्र व स्त्री यांचा अपहार करितो, त्याला अत्यंत भयंकर असे यमसेवक कालपाशानें बांधून तामिस्र नरकामध्यें टाकितात व त्यांना अन्नपाणी न देतां काठीनें मारणें, भीति घालणें इत्यादि इतकें दुःख देतात कीं, प्राणी त्याच वेळीं त्या अंधकारमय नरकामध्यें मूर्च्छा पावतो ॥ ८ ॥ तसेंच जो पुरुष एखाद्या पुरुषाला फसवून त्याची स्त्री, द्रव्य इत्यादिकांचा उपभोग घेतो, तो अंधतामिस्र नरकामध्यें जाऊन पडतो. तेथें पाडलेला व यातना भोगावयास लाविलेला तो प्राणी मुळें तोडलेला वृक्ष जसा अचेतन होऊन पडतो त्याप्रमाणें वेदनांच्या योगानें बुद्धिहीन व दृष्टिहीन होतो, म्हणून त्या नरकाला अंधतामिस्र असें म्हणतात ॥ ९ ॥ जो मनुष्य, या लोकीं हें शरीर व द्रव्यादिक सर्व माझें आहे असें मानून इतर प्राण्यांशीं द्रोह करीत केवळ आपल्या कुटुंबाचें प्रतिदिवशीं पोषण करितो, तो त्या कुटुंबाचा या लोकींच त्याग करून आपणच त्या पापाच्या योगानें रौरव नरकामध्यें पडतो ॥ १० ॥ हे राजा, या लोकीं कुटुंबाचें पोषण करण्याकरितां त्यानें जे प्राणी जशा रीतीनें मारिले असतील ते त्या पुरुषाला परलोकीं यमयातना होऊं लागली म्हणजे रुरुनामक प्राणी होऊन, जशी त्यानें पूर्वीं त्यांना पीडा दिलेली असेल, त्याप्रमाणें त्याला उलट पीडा देतात, म्हणून या नरकाला रौरव असें नांव दिलें आहे. रुरु हें सर्पापेक्षांहि अतिक्रूर अशा एका प्राण्याचें नांव आहे ॥ ११ ॥ याप्रमाणेंच महारौरव नांवाचा आणखी एक नरक असून जो प्राणी दुसऱ्या प्राण्याचा द्रोह करून आपल्या देहाचें पोषण करितो, तो त्यांत जाऊन पडतो. तेथें पडलेल्या त्या पुरुषाला क्रव्याद नांवाचे रुरु मांसासाठीं चावे घेतात ॥ १२ ॥ जो कोणी क्रूर स्वभावाचा मनुष्य या लोकीं पशूंना किंवा पक्ष्यांना जिवंत शिजवितो त्याची राक्षस सुद्धां निंदा करतात. अशा निर्दय पुरुषाला परलोकीं कुंभीपाकनामक नरकामध्यें यमाचे सेवक तापलेल्या तेलामध्यें शिजवितात ॥ १३ ॥ तसेंच जो पुरुष या लोकीं पिता, ब्राह्मण व देव यांचा द्रोह करितो, त्याला यमदूत दहा हजार योजनें घेराच्या कालसूत्रनामक नरकामध्यें पाडतात. तो ताम्रमय असून त्यांतील पटांगण खालून अग्नीच्या व वरून सूर्याच्या तापानें अतिशयच तापलेलें असतें. तेथें क्षुधा व तृषा यांच्या योगानें त्याच्या शरिराचा आंतून व बाहेरून दाह होत असतो आणि त्यानें पूर्वीं मारिलेल्या पशूंच्या अंगांवर जितके केंस असतात, तितकीं सहस्र वर्षेंपर्यंत त्याच्या अंगाचा भडका होऊन त्याला त्या नरकांत बसतांना, निजतांना, लोळतांना, उभा राहतांना व धावतांना अतिशय यातना भोगाव्या लागतात ॥ १४ ॥ जो पुरुष या लोकीं कोणत्याहि प्रकारची अडचण नसतांना आपल्या वेदमार्गापासून भ्रष्ट होऊन पाखंडमार्गाचा स्वीकार करितो, त्याला यमदूत असिपत्रवननामक नरकांत ढकलून देऊन, चाबकानें झोडपितात. तेथें तो जिकडेतिकडे सैरावैरां धांवूं लागला कीं दोहों बाजूंना धारा असलेल्या तालवनांच्या तरवारीसारख्या पानांनीं त्याचें सर्वांग छिन्न होतें; आणि 'मेलों, रे मेलों !' असें ओरडत तो पावलोंपावलीं होणाऱ्या अत्यंत वेदनामुळें मूर्च्छित होऊन पडतो. याप्रमाणें स्वधर्माचा त्याग करणारा तो पुरुष पाखंडमार्गाचा स्वीकार केल्याचें फळ भोगितो ॥ १५ ॥ तसाच जो मनुष्य या लोकीं राजा किंवा राजाचा

अधिकारी असून दंड करण्यास अयोग्य अशा पुरुषाला दंड करितो अथवा ब्राह्मणाला देहदंड करितो, तो आपल्या या पापांमुळें यमलोकीं गेल्यावर सूकरमुखनामक नरकामध्यें पडतो. तेथें अतिप्रबळ यमदूतांनीं त्याचे अवयव पिळून टाकिले म्हणजे जसा येथें घाण्यांत लावलेला ऊंस पेरें फुटूं लागलीं म्हणजे मोठ्यानें शब्द करितो त्याप्रमाणें तो करुणायुक्त स्वरानें आक्रोश करूं लागतो आणि या लोकीं त्यानें दंड करून कोंडलेल्या निरपराधी पुरुषांना जशी मूर्च्छा येते त्याप्रमाणें त्यालाहि तेथें कधींकधीं मूर्च्छा प्राप्त होऊन तो महत्संकटांत बुडून जातो ॥ १६ ॥ तसाच स्वतः ब्राह्मणादिभावानें विधिनिषेधपूर्वक आचरण केलेल्या कर्मांनीं आपली जीविका चालविणारा व विवेकाच्या योगानें दुसऱ्यांच्या दुःखांचें ज्ञान होत असलेला जो पुरुष, ज्यांची ईश्वरानें मनुष्यरक्तप्राशनादिक वृत्ति नेमिलेली आहे व ज्यांना दुसऱ्यांच्या दुःखाचें ज्ञान नसतें, अशा ढेंकूण वगैरे प्राण्यांना या लोकीं मारितो, तो परलोकीं अंधकूपनामक नरकामध्यें जाऊन पडतो व त्या ठिकाणीं, त्यानें या लोकीं ज्यांचा म्हणून घात केला असेल तेच पशु, मृग, पक्षी, सर्प, डांस, उवा, ढेंकूण, माशा इत्यादिक प्राणी त्याचा सर्व प्रकारें द्रोह करूं लागतात. त्यामुळें जसा जीव अनेक रोगांनीं ग्रस्त झालेल्या शरीरामध्यें दुःख भोगितो त्याप्रमाणें निबिड अंधकारांत निद्रासुखरहित व एकत्र स्थितिरहित होऊन तो इकडेतिकडे भटकूं लागतो ॥ १७ ॥ जो पुरुष या लोकीं पंचमहायज्ञ न करितां व जें कांहीं अन्नादिक प्राप्त झालें असेल तें अतिथि, याचक व वृद्ध यांना न देतां आपणच भक्षण करितो, तो शास्त्रानें कावळ्यासारखा मानिलेला आहे. दान दिल्याखेरीज व अग्नीमध्यें हवन केल्याखेरीज अन्न भक्षण करणारा जो असतो, तो पुरुष परलोकीं कृमिभोजननामक अधम नरकामध्यें जाऊन पडतो आणि त्याठिकाणीं लक्ष योजनें विस्तृत अशा कृमींच्या कुंडामध्यें स्वतः कृमि होतो. तेथील इतर कृमि त्याला खाऊं लागतात व तो आपणाहि त्या कृमींनाच खात असतो. याप्रमाणें जोंपर्यंत त्याचें पातक असेल तोंपर्यंत तो आपल्या प्रायश्चित्तरहित आत्म्याला पीडा देतो ॥ १८ ॥ हे राजा, जो पुरुष या लोकीं चोरी करून अथवा आपत्काल नसतांहि ब्राह्मणाचें अथवा दुसऱ्या कोणाचें सुवर्णरत्नादिक बलात्कारानें हरण करितो, त्या पुरुषाचें अंग परलोकीं यमपुरुष लोखंडाच्या तापलेल्या गोळ्यांनीं भाजतात आणि सांडसांनीं त्याच्या त्वचेचे तोडून लचके काढितात ॥ १९ ॥ जो पुरुष या लोकीं गमन करण्यास अयोग्य अशा स्त्रीशीं गमन करितो व तसेंच जी स्त्री अगम्य पुरुषांशीं रत होत्ये त्या उभयतांना परलोकीं यमदूत चाबकानें ताडन करीत व तापविलेल्या लोखंडी पुतळीशीं पुरुषाला व तशाच प्रकारच्या पुरुषाच्या पुतळ्याशीं स्त्रीला आलिंगन द्यावयास लावितात ॥ २० ॥ जो पुरुष या लोकीं पशु इत्यादिकांशींहि गमन करितो, तो परलोकीं नरकांत गेला असतां त्याला वज्रासारख्या कठोर काट्यांनीं भरलेल्या सांवरीवर चढवून यमदूत फरफर ओढितात ॥ २१ ॥ जे राजे किंवा राजांचे अधिकारी या लोकीं धर्ममार्गाचा उच्छेद करून टाकितात, ते धर्ममर्यादा मोडणारे पुरुष मरण पावल्यानंतर वैतरणीनामक नरकामध्यें पडतात. त्या नरकाच्या सभोंवार खंदकाप्रमाणें बनलेल्या वैतरणी नदीमध्यें जलजंतूंचे

समुदाय त्यांना ठिकठिकाणीं खात असतात आणि आपल्या पातकांमुळें विष्ठा, मूत्र, पूं, रक्त, केंस, नखें, हाडें, चरबी, मांस आणि वसा हीं वाहून नेणाऱ्या त्या नदीमध्यें ते पापी असतांहि देहाचा व प्राणांचा वियोग न पावतां आपल्या पापकर्माच्या वेगानें वाहात व कर्मफळाचें वारंवार स्मरण करीत पश्चात्ताप पावतात ॥ २२ ॥ जे पुरुष इहलोकीं शुद्धतेचे व आचाराचे नियम सोडून देऊन निर्लज्जपणानें शूद्र स्त्रियांशीं गमन करितात आणि पशूंसारखे यथेच्छेपणें वागतात, ते सुद्धां मरणानंतर पूं, विष्ठा, मूत्र, कफ व मळ यांनीं परिपूर्ण असलेल्या पूयोपदनानक नरकामध्यें पडतात, आणि त्यांतील तेच अतिशय घाणेरडे पदार्थ भक्षण करितात ॥ २३ ॥ तसेंच या लोकीं जे ब्राह्मणादि लोक कुत्रीं, गर्दभ इत्यादिकांचें पालन करून शिकार करीत असतात आणि विहित कर्मांवांचून इतर प्रसंगीं पशूंची हिंसा करितात; त्यांच्यावर सुद्धां परलोकीं यमदूत नेम धरून बाण सोडतात ॥ २४ ॥ जे दांभिक पुरुष या लोकीं मांस खाण्यासाठीं दांभिकपणें यज्ञ करून पशूंना मारितात, ते परलोकीं वैशसनामक नरकामध्यें पडले असतां त्यांना यमदूत अनेक प्रकारच्या यातना देऊन मारितात ॥ २५ ॥ जो ब्राह्मण या लोकीं काममोहित होऊन आपल्या वर्णाच्या अन्य स्त्रीला जारपणानें भोगितो, किंवा बलात्कारानें मुखमैथुन करून स्त्रीकडून रेत पिववितो, त्या पापी पुरुषाला परलोकीं यमदूत रेताच्या प्रवाहांत पाडून त्याच्याकडून रेत पिववितात ॥२६॥ या लोकीं जे राजे अथवा राजांचे अधिकारी, चोरी करितात, आग लावतात, विष घालितात किंवा व्यापारी लोकांच्या मेळ्यांना लुटतात, त्यांनाहि मरण पावल्यानंतर परलोकीं वज्रासारख्या दाढा असणारे सातशें वीस श्वानरूपी यमदूत मोठ्या आवेशानें तोडून तोडून खातात ॥ २७ ॥ जो पुरुष या लोकीं साक्ष देतांना द्रव्य देण्याघेण्याच्या व्यापारांत किंवा दान देतांना कोणत्याहि कारणानें खोटें बोलतो, तो मरण पावला म्हणजे परलोकीं त्याला यमदूत निराधार व तरंगांनीं रहित अशा अवीचिमत् नांवाच्या नरकामध्यें शंभर योजनें उंच असलेल्या पर्वताच्या शिखरावरून खालीं डोकें व वर पाय करून लोटून देतात. तेथें दगडाची फरशी केलेलें स्थळ असून तें पाण्यासारखें भासत असल्यामुळें, त्या नरकाला ‘अवीचिमत्’ असें म्हणतात. त्या फरशीवर पडून प्राण्याच्या शरीराचे तिलप्राय तुकडे होत असूनहि तो मरत नाहीं; तर लागलाच जशाचा तसा होतो व मग त्याला पुनः पर्वतावर चढवून खालीं लोटून देतात ॥ २८ ॥ या लोकीं जो कोणी ब्राह्मण, स्त्री अथवा दुसरा कोणीहि व्रतस्थ पुरुष, मोहानें सुरापान करितो, आणि तसेंच जो क्षत्रिय अथवा वैश्य मोहानें सोमपान करितो, त्याला नरकामध्यें नेल्यावर यमदूत त्याचा उरावर पाय देऊन त्याच्या मुखामध्यें अग्नीच्या योगानें कढून रसरूप बनलेलें पोलाद ओतितात ॥ २९ ॥ तसाच या लोकीं जो स्वतः अधम असूनहि मीच मोठा प्रतिष्ठित आहे असा अभिमान धारण करून, जन्म, तप, विद्या, आचार, वर्ण आणि आश्रम यांनीं युक्त असलेल्या श्रेष्ठ लोकांना बहुमान देत नाहीं, तो जिवंत असतांनाहि मेल्यासारखा असलेला पुरुष, मेल्यावर क्षारकर्दमनामक नरकांत खालीं डोकें वर पाय करून पडला असतां, तेथें

दुर्धर यातना भोगितो ॥ ३० ॥ तसेंच या लोकीं जे पुरुष मनुष्यपशूंचा बळि देऊन भैरवादिकांचें आराधन करितात व ज्या स्त्रिया नरमांस भक्षण करितात, तीं सर्व यमसदनीं गेलीं म्हणजे, त्यांनीं येथें पशूप्रमाणें मारलेले जे मनुष्य असतील तेच तेथें राक्षसगण होऊन त्यांना यातना करीत खाटकांप्रमाणें त्यांचे तुकडे तुकडे करून त्यांचें रक्त पितात, नाचतात आणि हर्षानें गात सुटतात. इहलोकीं त्या मनुष्यभक्षकांनीं नरमांस भक्षण करून जसें आनंदानें नृत्य वगैरे केलें असेल तसेंच त्यांनीं मारलेले मनुष्यादिकहि परलोकीं करितात ॥ ३१ ॥ तसेंच या लोकीं जे पुरुष अरण्यांत किंवा गांवांत निरपराधी प्राण्यांना प्रथम खाणेंपिणें घालण्याचा विश्वास दाखवून, खाण्याच्या लोभानें ते जवळ आले असतां त्यांना धरून शूळ अथवा सूत्रादिकांमध्यें टोंचून, हें आपलें खेळणें आहे असें समजून दुःख देतात ते पुरुषहि मेले म्हणजे त्यांना यमदूत सुळावर चढवितात. तेव्हां क्षुधा व तृषा यांच्या योगानें अगदीं पीडित झालेल्या व तीक्ष्ण चोंचीच्या कंक, गिधाड वगैरे पक्ष्यांनीं तीक्ष्ण चोंचींनीं टोंचिलेल्या पुरुषांना आपल्या पापाचें स्मरण होतें ॥ ३२ ॥ हे राजा, तसेंच या लोकीं जे सर्पासारखे क्रूर स्वभावाचे पुरुष, प्राण्यांना विनाकारण दुःख देतात, तेहि मरण पावले म्हणजे दंदशूकनामक नरकामध्यें पडतात. त्या ठिकाणीं कितीएक पांच तोंडांचे व कांहीं सात तोंडांचे असे सर्प आहेत, ते त्यांच्याजवळ येऊन उंदरांप्रमाणें त्यांना गिळून टाकितात ॥ ३३ ॥ जे पुरुष या लोकीं प्राण्यांना अंधाऱ्या विहिरींत, धान्याच्या पेंवांत अथवा कोठारांत किंवा गुहा इत्यादि ठिकाणीं कोंडून ठेवितात, ते परलोकीं गेले असतां यमदूत त्यांना त्याच स्थानांमध्यें बसवून विषारी अग्नीपासून निघालेल्या धुरानें गुदमरून जातील अशा रीतीनें कोंडून ठेवितात ॥ ३४ ॥ जो गृहस्थाश्रमी पुरुष या लोकीं वारंवार क्रोधयुक्त होऊन आपल्या घरीं आलेल्या अतिथि-अभ्यागतांकडे आपल्या पापी नेत्रानें, त्यांना आतां जाळतोच कीं काय, अशा रीतीनें पाहतो, तो पापदृष्टी पुरुष मरणानंतर नरकामध्यें पडला म्हणजे तेथें वज्रासारख्या चोंची असणारे गृध्र, कंक, काक, वट इत्यादि पक्षी त्याचे डोळे बलात्कारानें आपल्या मोठ्या शक्तीनें उपटून बाहेर काढितात ॥ ३५ ॥ जो पुरुष, या लोकीं मीच श्रीमंत असा अभिमान धारण करून अहंकारानें युक्त, वक्रदृष्टि आणि गुरु इत्यादिकांविषयीं सुद्धां 'हे धन चोरतात' अशी शंका घेतो किंवा द्रव्यनाशाच्या चिंतेनें ज्याचें हृदय व मुख शुष्क होतें आणि साशंक वृत्तीनें राहून जो ब्रह्मराक्षसाप्रमाणें या लोकीं द्रव्याचें केवळ रक्षण करितो व तें मिळविण्याकरितां, वाढविण्यकरितां पातकांचा संग्रह करितो, तो मरण पावल्यावर सूचीमुखनामक नरकामध्यें पडतो. त्या ठिकाणीं यमदूत, पिशाचाप्रमाणें द्रव्यरक्षण करणाऱ्या त्या पापी पुरुषाच्या सर्व अवयवांना कंथा शिवणाऱ्या शिंप्याप्रमाणें दोरे घालून शिवून टाकितात ॥ ३६ ॥ हे राजा, याप्रमाणें यमलोकीं शेंकडों हजारों नरक आहेत. जे कांहीं मी तुला आतां पापी पुरुष सांगितले ते व यांचेखेरीजहि जे कोणी दुसरे अधर्मानें वागणारे असतात तेहि लोक आपल्या पातकांच्या यथामानानें त्या नरकांत प्रवेश करितात. उलट धर्माला अनुसरून वागणारे लोक स्वर्गादि लोकामध्यें वास करितात. आणि ते पुनः जन्म घेण्याला

निमित्त असे आपले धर्म व अधर्म ह्यांचे अवशेष राहिलेले अंश घेऊन या मनुष्य-लोकामध्यें प्रवेश करितात ॥३७॥ असो.हे राजा, निवृत्तिमार्ग तर मीं तुला पूर्वीच सांगितला आहे. हे राजा, पुराणांमध्यें जो प्रदेश चतुर्दशलोकरूपी म्हणून वर्णिला आहे, तो ब्रह्मांड-कोशाएवढाच आहे. हें साक्षात् महापुरुष भगवान् नारायणाचें स्वकीय मायेच्या गुणांनीं रचिलेलें स्थूलरूप मी तुला सांगितलें. जो पुरुष आदरानें भगवंताच्या या ब्रह्मांडरूपाचें श्रवण करितो; पठण करितो किंवा तें लोकांना ऐकवितो, त्याची बुद्धि, श्रद्धा आणि भक्ति यांच्या योगानें शुद्ध होऊन, त्याच परमात्म्या भगवंताच्या उपनिषदांत वर्णन केलेल्या व जाणण्यास अत्यंत कठिण अशा तत्स्वरूपाचें ज्ञान त्याला होतें ॥३८॥ हे राजा, योगी पुरुषानें भग-वंताच्या स्थूल आणि सूक्ष्म अशा या दोन्ही स्वरूपांचें श्रवण करून आपलें मन प्रथम स्थूल स्वरूपीं लावावें, आणि तेथें तें स्थिर झालें म्हणजे नंतर हळूहळू बुद्धीच्या योगानें तें सूक्ष्मस्वरूपीं न्यावें ॥३९॥ हे राजा, मी तुला भूमि, द्वीपें, खंडें, नद्या, पर्वत, आकाश, समुद्र, पाताळें, दिशा, नरक आणि नक्षत्रसमूह यांनीं युक्त अशा लोकरचनेचें वर्णन करून सांगितलें आहे. ही लोकरचना म्हणजेच सर्व जीवसमूहांचें आश्रयस्थान असें ईश्वराचें आश्चर्यकारक स्थूल स्वरूप होय ॥ ४० ॥

**सव्विसावा अध्याय समाप्त**

---

# ॥ पांचवा स्कंध समाप्त ॥

---